दादा भगवान कथित

# पति-पत्नीचा दिव्य व्यवहार

(संक्षिप्त)



निभावून घ्या चूका एकमेकांच्या, तर बनेल विवाहित जीवन सुखमय.
'वन फॅमिली' बनून रहा प्रेमाने, तर होणार नाही जीवन दुःखमय.

दादा भगवान कथित

# पति-पत्नीचा दिव्य व्यवहार

(संक्षिप्त)

मुळ गुजराती संकलन : डॉ. नीरूबहन अमीन

अनुवाद : महात्मागण

**प्रकाशक** : अजित सी. पटेल
दादा भगवान आराधना ट्रस्ट,
दादा दर्शन, 5, ममतापार्क सोसायटी,
नवगुजरात कॉलेजच्या मागे, उस्मानपुरा,
अहमदाबाद - ३८० ०१४, गुजरात.
फोन - (०७९) ३९८३०१००



**प्रथम आवृत्ति** : ३,००० ऑगष्ट, २०१४

**भाव मूल्य** : 'परम विनय' आणि
'मी काहीच जाणत नाही', हा भाव!

**द्रव्य मूल्य** : **२५ रुपये**

**मुद्रक** : अंबा ओफसेट
पार्श्वनाथ चैम्बर्स, नव्या रिज़र्व बँके जवळ,
उस्मानपुरा, अहमदाबाद-३८० ०१४.
फोन : (०७९) २७५४२९६४

# त्रिमंत्र




नमो अरिहंताणं

नमो सिद्धाणं



नमो आयरियाणं

नमो उवज्झायाणं



नमो लोए सव्वसाहूणं

एसो पंच नमुक्कारो,

सव्व पावप्पणासणो

मंगलाणं च सव्वेसिं,

पढमं हवइ मंगलम् ॥१॥

ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥२॥

ॐ नमः शिवाय ॥३॥

जय सच्चिदानंद



## दादा भगवान कोण ?

जून १९५८ संध्याकाळची अंदाजे सहाची वेळ, सुरत स्टेशनवर अलोट गर्दी होती. प्लेटफार्म नंबर तीनच्या रेल्वेच्या बाकावर बसलेले श्री. अंबालाल मुळजीभाई पटेल रुपी देहमंदिरात नैसर्गिक स्वरूपात कित्येक जन्मांपासून व्यक्त होण्यासाठी आतूर असलेले 'दादा भगवान' संपूर्णपणे प्रगट झाले आणि निसर्गाने सर्जन केले अध्यात्माचे अद्‌भूत आश्चर्य! एका तासात विश्वदर्शन लाभले! आपण कोण ? भगवंत कोण ? जग कोण चालवत आहे ? कर्म म्हणजे काय ? मुक्ती कशाला म्हणतात ? इत्यादी जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांचे संपूर्ण निराकरण केले! आणि जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांचा संपूर्ण उलगडा झाला. अशा प्रकारे निसर्गाने विश्वाला प्रदान केले एक अद्वितीय, संपूर्ण दर्शन आणि ह्याचे माध्यम बनले अंबालाल मूळजीभाई पटेल, जे होते गुजरातचे चरोतर जिल्ह्यातील भादरण गावचे पाटील, कंट्राक्टचा व्यवसाय करणारे आणि तरीही पूर्ण वीतराग पुरुष.

त्यांना ज्ञान प्राप्ति झाली त्याच प्रमाणे ते फक्त दोन तासात इतर मुमुक्षुनां सुद्धा आत्मज्ञान प्राप्ति करून देत होते, त्यांच्या सिद्ध झालेल्या अद्‌भूत ज्ञान प्रयोगाद्वारे. त्याला अक्रम (क्रमविरहीत) मार्ग म्हणतात. अक्रम म्हणजे क्रमाशिवायचा आणि क्रम म्हणजे पायरी पायरीने, क्रमाक्रमाने वर चढायचे! अक्रम म्हणजे लिफ्ट मार्ग! शॉर्ट कट!!

ते स्वत: प्रत्येकाला 'दादा भगवान कोण ?' ह्याबद्दलची फोड करून देताना म्हणायचे की, ''हे दिसतात ते 'दादा भगवान' नाहीत. हे तर ए.एम. पटेल आहेत. आम्ही ज्ञानीपुरुष आहोत आणि आत प्रगट झाले आहेत ते दादा भगवान आहेत. ते चौदलोकचे नाथ आहेत, ते तुमच्यात पण आहेत, सर्वांमध्ये आहेत! तुमच्यात अव्यक्त रुपात बसलेले आहेत आणि 'इथे' संपूर्णपणे व्यक्त झालेले आहेत! मी स्वत: परमेश्वर नाही. माझ्या आत प्रगट झालेले 'दादा भगवान' त्यांना मी पण नमस्कार करतो.''

व्यापारात धर्म असावा परंतु धर्मात व्यापार नसावा. ह्या सिद्धांताने ते संपूर्ण जीवन जगले. त्यांनी जीवनात कधीही कोणाकडूनही पैसे घेतले नाहीत, उलट स्वत:च्या व्यवसायातून झालेल्या फायद्यातून भक्तांना यात्रा करवीत असत.

## आत्मज्ञान प्राप्तिची प्रत्यक्ष लींक

मी तर, काही लोकांनां माझ्या हातून सिद्धि प्राप्त करून देणार आहे. माझ्या नंतर कोणी तरी पाहिजे की नाही! नंतर लोकांना मार्ग (दाखविणारा) हवा की नाही?

**– दादाश्री**

परम पूज्य दादाश्रींना जे ज्ञान प्राप्त झाले, ते अद्‌भुत आत्मज्ञान, त्यांनी देश-विदेश परिभ्रमण करून, दुसऱ्या लोकांना सुद्धा दोन तासात प्राप्त करून दिले होते, त्याला ज्ञानविधि म्हणतात. दादाश्रींनी आपल्या जीवनकाळातच पूज्य डॉ. नीरूबहन अमीन (नीरूमा)यानां आत्मज्ञान देण्याची ज्ञानसिद्धि प्रदान केली होती. दादाश्रींच्या देहविलय पश्चात् नीरूमा आतापर्यंत मुमुक्षुजनांना सत्संग आणि आत्मज्ञानाची प्राप्ति, निमित्तभावाने करत होत्या. त्याचबरोबर पूज्य दीपकभाईनांही दादाश्रींनी सत्संग करण्याची सिद्धि प्रदान केली होती. पूज्य नीरूमांच्या उपस्थितीतच त्यांच्या आशीर्वादाने पूज्य दीपकभाई देश-विदेशात कितीतरी ठिकाणी जाऊन मुमुक्षुंना आत्मज्ञान प्राप्ति करून देत होते, जे पूज्य नीरूमांच्या देहविलय पश्चात् आज पण चालू आहे.

ह्या आत्मज्ञान प्राप्ति नंतर हजारो मुमुक्षु संसारात राहून, सर्व जबाबदाऱ्या सांभाळून सुद्धा मुक्त राहून आत्मरमणतेचा अनुभव करत आहेत.

पुस्तकात लिहिलेली वाणी मोक्षार्थीला मार्ग दाखविण्याच्या हेतूने अत्यंत उपयोगी सिद्ध झाली आहे. परंतु मोक्ष प्राप्तिसाठी आत्मज्ञान प्राप्त करणे जरुरी आहे. अक्रम मार्ग द्वारा आत्मज्ञानाची प्राप्ति आज पण चालू आहे. त्यासाठी प्रत्यक्ष आत्मज्ञानीला भेटून आत्मज्ञानाची प्राप्ति करेल तेव्हाच हे शक्य आहे. प्रज्वलित दिवाच दुसरा दिवा प्रज्वलित करू शकतो.

# निवेदन

आत्मज्ञानी श्री अंबालाल मुळजीभाई पटेल, ज्यांना सर्वजण 'दादा भगवान'ह्या नावांने ओळखतात. त्यांच्या श्रीमुखातून आत्मतत्त्वासाठी जी वाणी निघाली, ती रेकॉर्ड करून संकलन व संपादन करून ग्रंथरुपाने प्रकाशित करण्यात आली आहे. ह्या पुस्तकात परम पूज्य दादा भगवानांच्या श्रीमुखातून निघालेल्या सरस्वतीचा मराठी अनुवाद केला आहे. ह्यात त्यांचे उत्तम व्यवहारज्ञान आणि आत्मविज्ञान समाविष्ट आहे. सुज्ञ वाचकाने अध्ययन केल्यावर त्याला आत्मसाक्षात्काराची भूमिका निश्चित होते, असे कित्येकांचे अनुभव आहेत.

ते 'दादा भगवान' तर त्यांच्या देहात असलेल्या परमात्माला म्हणत होते. शरीर हे परमात्मा होवू शकत नाही. कारण शरीर विनाशी आहे. परमात्मा तर अविनाशी आहे आणि जे प्रत्येक जीवमात्रच्या आत आहे.

प्रस्तुत अनुवादामध्ये विशेष लक्ष ठेवलेले आहे की प्रत्येक वाचकाला प्रत्यक्ष दादांची वाणीच, ऐकत आहोत असा अनुभव व्हावा.

ज्ञानींच्या वाणीला मराठी भाषेत यथार्थपणे अनुवादित करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु दादाश्रींच्या आत्मज्ञानाचा खरा उद्देश 'जसा आहे तसा' आपल्याला गुजराथी भाषेत अवगत होईल. ज्यांना ज्ञानाचा गहन अर्थ समजून घ्यायचा असेल, ज्ञानाचा खरा मर्म जाणायचा असेल, त्यांनी ह्या हेतूने गुजराती भाषा शिकावी, असा आमचा अनुरोध आहे.

अनुवादासंबंधी उणीवांसाठी आपले क्षमाप्रार्थी आहोत.

# प्रस्तावना

निगोदातून एकेंद्रिय आणि एकेंद्रियापासून पंचेंद्रियापर्यंतच्या उत्क्रांतीच्या परिणामी मनुष्याचे परिणमन झाले, तेव्हापासून युगलिक स्त्री व पुरुष दोघेही एकत्र जन्मले, लग्न केले आणि निवृत्त झाले.... अशाप्रकारे उदय झाला पती-पत्नीच्या व्यवहाराचा ! सत्युग, द्वापर आणि त्रेतायुगामध्ये प्राकृतिक सरळतेमुळे पति-पत्नीच्या जीवनात समस्या क्वचितच येत असतात. आज ह्या कलियुगात पति-पत्नी मध्ये दररोज क्लेश, कटकटी आणि मतभेद बहुधा सर्वत्र दिसतात!!! ह्याच्यातून बाहेर निघून पती-पत्नीने आदर्श जीवन कसे जगावे, याचे मार्गदर्शन ह्या काळानुसार कोणत्या शास्त्रातून मिळेल ? तेव्हा आता काय करावे? आजच्या लोकांच्या वर्तमान समस्या आणि त्या समस्यांचे त्याच्यांच भाषेत समाधान करण्याचे साधे-सरळ उपाय तर ह्या काळाचे प्रकट ज्ञानीच देऊ शकतात. असे प्रकट ज्ञानी पुरुष, परम पूज्य दादाश्रींना त्यांच्या ज्ञानावस्थेच्या तीस वर्षा दरम्यान पति-पत्नीमध्ये होणाऱ्या घर्षणाच्या समाधानसाठी विचारलेल्या हजारो प्रश्नांतून संकलन करून, येथे प्रस्तुत पुस्तकात प्रकाशित करण्यात येत आहे.

पति-पत्नीमध्ये होणाऱ्या अनेक जटील समस्यांच्ये समाधानरूपी हृदयस्पर्शी आणि कायम समाधान करणारी ही वाणी येथे सुज्ञ वाचकांना त्यांच्या वैवाहिक जीवनात एकमेकांना देवी-देवता सारखे पाहण्याची अचूक दृष्टि उत्पन्न करून देईल अशी आहे, मात्र मनापासून वाचून समजलात तरच!

शास्त्रात गूढ तत्वज्ञान उपलब्ध होत असते, परंतु ते तत्वज्ञान शब्दातच मिळत असते. शास्त्राद्वारे त्याहून पुढे जाता येत नाही. दादांचे जे शब्द आहेत, ते भाषेच्या दृष्टीने साधे-सरळ आहेत परंतु ज्ञानी पुरुषांचे दर्शन निरावरण आहे, म्हणून त्यांचे प्रत्येक वचन आशयपूर्ण, मार्मिक, मौलिक तसेच समोरच्याच्या दृष्टीकोनाला तंतोतंत समजत असल्यामुळे श्रोत्यांच्या दर्शनास सुस्पष्टपणे खोलून त्यांना अधिक उंचीवर नेऊन पोहचवितात.

व्यावहारिक जीवनात पडलेले पंक्चर कसे जोडावे (ठीक करायचे)

हे तर त्याचे एक्सपर्ट अनुभवीच शिकवू शकतील. संपूर्ण आत्मज्ञानी पूज्य दादाश्री, स्वत:च्या पत्नीसोबतच्या आदर्श व्यवहाराला पूर्णपणे अनुभवून, अनुभववाणी द्वारा त्याचे समाधान करतात, जे अत्यंत प्रभावीपणे काम करते.

संपूज्य दादांश्रीकडे कितीतरी पती, पत्नी आणि जोडप्यांनी स्वत:च्या दु:खमय जीवनातील समस्यांचे विवरण केले, कधी खाजगीमध्ये तर कधी जाहीर सत्संगात! ह्या विशेष गोष्टी जास्त करुन अमेरिकेत झाल्या होत्या. जिथे सर्व फ्रीली, मनमोकळेपणाने स्वत:च्या खाजगी जीवनाबद्दल बोलू शकतात. निमित्ताधीन परम पूज्य दादांश्रीची अनुभववाणी निघाली ज्याचे संकलन प्रत्येक वाचणाऱ्या पति-पत्नीला मार्गदर्शक ठरेल, हे निश्चित आहे! कधी पतीला टोकणे तर कधी पत्नीला झटकणे, ज्या निमित्ताला जे सांगणे आवश्यक असेल त्याला ते आरपार बघून निष्कर्ष काढून दादाश्री आपल्या वचनबळाने रोग निर्मुलन करत होते.

सुज्ञ वाचकांना हिच विनंती की गैरसमजुतीने दुरुपयोग करु नका की दादांनी तर स्त्रियांचेच दोष दाखविले आहेत, किंवा पतीच्या मालकीपनालाच दोषित ठरवले आहे! मालकाच्या मालकीपणाचे दोष दाखवणारी वाणी आणि पत्नीला पत्नीच्या प्राकृतिक दोषांना दर्शवणारी वाणी दादांच्या श्रीमुखातून प्रवाहित झाली आहे. ती योग्य रीतीने ग्रहण करुन स्वत:च्या शुद्धीकरण हेतू मनन, चिंतन करावे हीच पाठकांना नम्र विनंती!

डॉ. नीरुबहन अमीन

# संपादकीय

लग्न करताच मिळाली, फ्री ऑफ कॉस्ट स्वयंपाकीण,
झाडूवाली, लादीपुसणारी आणि धोबीण फुकटची!

चोवीस तास नर्सरी, आणि पतीला सिन्सियर,
स्विकारले सासर, सोडले आई-वडील, भावंड माहेर!

मांगे ना कधी पगार-बोनस-कमिशन किंवा बक्षीस!
मागितली साडी जर कधी, तर का येते पतीला चीड?

अर्धा हिस्सा मुलांमध्येही, पण डिलिवरी करत कोण?
त्यावर मागे नाव पतीचे, मग का हो देता ताने?

पहा केवळ दोनच चूका स्त्रियांच्या, चरित्र्य किंवा घराचे नुकसान,
कढी खारट किंवा फोडली काच, छोट्या चूकांना द्या क्षमादान!

पत्नी चालेल उलट तेव्हा, पहा तिचे गुण, मोजा बलिदान,
घर-पत्नीला सांभाळणे, त्यातच मर्दा तुझे मोठेपण!

कुठपर्यंत समजाल पतीला, भोळा-बिन अक्कलेचा?
निरखून पारखून आणलेस तू, आपल्याच पसंतीचा!

पसंत केले, मागितला पती स्वत:हून वयाने मोठा,
उठक-बैठक करणारा, जर आणला असता छोटा!

रूप, शिक्षण, उंचीत, मागितले सुपिरियर,
वेडपट, बावळट नको पण हवा आहे सुपर!

लग्ना नंतर, 'तु असा, तू तसा' का असे करता?
समजाल सुपिरियर शेवटपर्यंत, तर होईल संसार सुंदर!

घरात पती शूर, खुंटीला बांधलेल्या गायीला मारे,
शेवटी बेफाम होते गाय तेव्हा धरते वाघिणीचे रुप धरते!

पन्नाशीपर्यंत टोकत राहतात पूर्ण दिवस-रात्र,
मग मुले करतात वसुली, होतात आईच्या पक्षात!

'अपक्ष' होऊन राहतोस मुर्खा, घरातल्यांचे खातो मार,
आत्ता तरी सरळ हो, मिळव मुक्तीचा मार्ग!

जाड पती पण शोधतो 'फिगर', सौंदर्याचा रुबाब,
ज्याने केली स्तुती पत्नीची, तोच मनाने भोगून घेणार!

पहिले केले गुरु शाळेत, नंतर केले पत्नीला गुरु,
पहिले पसंत नव्हते चष्मे, नंतर झाली 'चश्मावधू'!

मनपसंत शोधण्यात, झाली मोठी चुक,
लग्न करुन पस्तावलेत, फसले गेलेत भरपूर!

जास्त क्लेश पत्नी संग, तर कर विषय बंद,
वर्षानंतर रिझल्ट पहा, जीवनात सुख–आनंद!

ब्रह्मचर्य चे ठेवा नियम, हेच विवाहितांचे लक्ष,
औषध प्यावे तेव्हाच जेव्हा ताप चढेल दोन्ही पक्षात!

औषध गोड म्हणून, रोज रोज पिऊ नका,
प्या नियमाने जेव्हा ताप चढेल दोघांत!

एक पत्नीव्रत जिथे, दृष्टि सुद्धा बिघडत नाही, बाहेर कधी,
कलियुगात आहे हेच ब्रह्मचर्य, ज्ञानी पुरुष दादा सांगे!

तिरसट बायको नी मी शहाणा, दोघात कोणाची पुण्याई?
तिरसट तुझ्या पापाने नी पुण्याने मिळाले शहाणे पती!

गुन्हा कोणाचा? जज कोण? इथे तर भोगतो त्याची चुक,
निसर्गाचा न्याय समजून घ्या, तर उडेल चूकांचे मूळ!

सांभाळता मित्रांना आणि गावाला, घरात मात्र लठ्ठेबाजी,
अरे! जिने सांभाळले जीवनभर, तिथेच चुकलास पाजी!

सांभाळतोस बाहे अब्रू, घरात मात्र बेअब्रू,
पहा उलटा न्याय, सुंदर जेवणात घालिसी खडे!

'माझी बायको, माझी बायको' बोलून मारलेस ममतेचे आट!
'नाही माझी', बोलेताच उलगडतील आतील दु:खाचे आटे!

लग्नानंतर पती म्हणतो, तुझ विन जगू कसा?!
मेल्यावर नाही झाला सता, नाही कोणी सती दिसत!

ही तर आसक्ति पुद्‌गलाची, नाही हे खरेप्रेम!
दिसे नाही दोष, नाही अपेक्षा, नाही द्वेष, तिथेच शुद्ध प्रेम!

तू असा नी तू अशी, अभेदतेत आला भेद ?
झाला शांतीचा अंत, जर झाला जरासा भेद !

एका डोळ्यात प्रेम नी, दुसऱ्या डोळ्यात सक्ती जिथे,
दोन्ही डोळ्याने पाहिले पत्नीला, जिंकाल संसार तिथे !

एका फॅमिलीसारखे जगा, करु नका माझे–तुझे,
पत्नीस चाललास सुधारण्यास, सुधारलेस का तुझे ?

आर्य नारीच्या कपाळावर कुंकू, ध्यान एकाच पतीचे,
रंगावे लागेल पूर्ण तोंड, कपाळ जर असेल परदेशी नारी !

एक दुसऱ्यांच्या चुका निभाऊन घ्या, हेच प्रेममय जीवन,
घटत–वाढत नाही कधी जे, तेच खरे प्रेम दर्शन !

– डॉ. नीरुबहन अमीन

# अनुक्रमणिका


| | |
|---|---|
| १. वन फॅमिली (एक कुटुंब) | १ |
| २. घरात क्लेश (भांडण) | २ |
| ३. पति-पत्नीत मतभेद | ११ |
| ४. जेवताना किट-किट | २५ |
| ५. मालक पाहिजे, मालकीपणा नको | २७ |
| ६. समोरच्यांची चुक काढण्याची सवय! | ३२ |
| ७. 'गाडी' चा गरम मूड | ३६ |
| ८. सुधारावे की सुधरावे | ३७ |
| ९. कॉमनसेन्स ने एडजस्ट एवरीव्हेर | ३८ |
| १०. दोन डिपार्टमेन्ट वेगळे | ३९ |
| ११. संशय जाळेल सोन्याची लंका | ४२ |
| १२. पतीपणाचा गुन्हा | ४४ |
| १३. दादांच्या दृष्टिने चला, पतींनो... | ४६ |
| १४. 'माझी' चे आटे उलगडतील असे | ४९ |
| १५. परमात्म प्रेमाची ओळख | ५० |
| १६. लग्न केले म्हणजे 'प्रोमिस टू पे' | ५३ |
| १७. पत्नीसोबत भांडण | ५६ |
| १८. पत्नी परतफेड करते तोलून मापून | ६४ |
| १९. पत्नीच्या तक्रारी | ७० |
| २०. परिणाम घटस्फोटाचे | ७९ |
| २१. सप्तपदीचे सार... | ८७ |
| २२. पति-पत्नीचे प्राकृतिक पर्याय | ९० |
| २३. विषयविकार बंद तिथे प्रेम संबंध | ९५ |
| २४. रहस्य ऋणानुबंधाचे...... | १०२ |
| २५. आदर्श व्यवहार, जीवनात..... | १०७ |

# पति-पत्नीचा दिव्य व्यवहार

## १. वन फॅमिली ( एक कुटुंब )

जीवन जगावेसे केव्हा वाटते की जेव्हा पूर्ण दिवस काहीही उपाधी (बाहेरुन येणारे दुःख) नसेल तर. जीवनात शांतता असेल, तेव्हा जगणे आवडेल. जर का घरात कटकटी (भांडण) होत असतील, तर जीवन जगणे कशा प्रकारे आवडेल?! हे तर जमणारच नाही न! घरात कटकट नाही असायला नको. एखाद्या वेळेस शेजाऱ्यांबरोबर वादविवाद होईल बाहेरच्या लोकांबरोबर होईल, पण घरातही? घरात फॅमिलीसारखे लाईफ जगले पाहिजे. फॅमिली लाईफ कशी असते? घरात प्रेम, प्रेम व प्रेम च असणार, आता तर अशी फॅमिली लाईफ राहिलीच कुठे? डाळ खारट झाली की बोंबाबोंम करुन घर डोक्यावर घेतात. मग डाळ खारट आहे असे ही बडबडतात! अंडर डेवलप्ड (अविकसित) प्रजा डेवलप्ड माणस कशी असतात की डाळ खारट झाली असेल तर ते बाजूला ठेवून देतील आणि दुसरे सारे जेवून घेतील. असे नाही का करु शकत?! डाळ बाजूला सारुन बाकीचे नाही जेवता येणार? ही अशी आहे फॅमिली लाईफ. बाहेर वादाविवाद करा ना! माय फॅमिलीचा अर्थ काय की आपल्यात कोणत्याही प्रकरची भानगड नाही. ऐडजस्टमेन्ट घेतली पाहिजे स्वतःच्या फॅमिलीत ऐडजस्ट होता आले पाहिजे, ऐडजस्ट ऐवरीव्हेर.

फॅमिली ऑर्गेनाइझेशन' (कुटुंब व्यवस्था) चे ज्ञान आहे का तुमच्याकडे.आपल्या हिन्दुस्थानात 'हाउ टू ऑर्गेनाइझेशन फॅमिली' ह्या ज्ञानाचीच कमी आहे. फोरेनवाले तर फॅमिली सारखे काही समजतच नाही. हे तर जेम्स वीस वर्षाचा झाला तर त्याचे आई वडिल, विलियम आणि

मेरी, जेम्स ला बोलतात की, तू वेगळा आणि आम्ही दोघे पोपट आणि मैना वेगळे! त्यांना फॅमिली ऑर्गेनाइज करण्याची जास्त सवयच नाही ना? आणि त्यांची फॅमिली तर स्पष्टच बोलते मेरी बरोबर विलियमला जमत नसेल तर डायवोर्सचीच वार्ता! आणि आपल्या इथे तर डायवोर्सची गोष्ट नसते. आपल्याकडे तर एकत्रच रहायचे. बाचाबाचीही करायची नी परत झोपायचे पण एकत्र त्याच रुममध्ये! हा जीवनाचा मार्ग नाही. ह्याला फॅमिली लाईफ नाही म्हटले जात.

आणि ह्या इंडियामध्ये तर लोक फॅमिली डॉक्टर पण ठेवतात. अरे, अजून फॅमिलीच झाली नाही, तिथे तू का डॉक्टर ठेवतो आहेस?

हे लोक फॅमिली डॉक्टर ठेवतात पण पत्नीच फॅमिली नाही? मोठ्या तोऱ्यात सांगतात, आमचे फॅमिली डॉक्टर आले! तर त्यांच्यासोबत तक्रार नाही करत. डॉक्टर ने बिल मोठे दिले तरी वाद नाही करत. आमचे फॅमिली डॉक्टर आहेत न! ते मनात असे समजतात की फॅमिली डॉक्टर ठेवले आहे म्हणून तर आमचा रुबाब वाढला आहे!

फॅमिलीच्या माणसांचा जरा हात लागला तर आपण त्यांच्याबरोबर भांडतो का? नाही ना. एका फॅमिली सारखे रहावे. बनावट नाही ना करायची, हे तर लोक बनावट करतात, तसे नाही करायचे. एक फॅमिली...... तुझ्या शिवाय मला करमत नाही असे बोलायचे. जरी आपल्यावर ते रागावले, तरीपण थोड्या वेळाने सांगा की, तू कितीही रागव पण तुझ्या शिवाय मला करमत नाही. असे बोला. इतका गुरुमंत्र बोला. असे कधीही बोलतच नाही ना! तुझ्या शिवाय चैन पडत नाही ना! असे बोलण्यात काही हरकत आहे का तुम्हाला? मनात तर प्रेम जरुर ठेवा पण थोडे फार बाहेर पण दाखवा.

## २. घरात क्लेश ( भांडण )

घरात कधी क्लेश होतो का? तुम्हाला कसे वाटते, घरात क्लेश झालेला आवडेल का?

**प्रश्नकर्ता :** कटकटी शिवाय तर दुनिया चालत नाही.

**दादाश्री :** तर मग परमेश्वर तर तिथे राहणारच नाही. जिथे क्लेश आहे तिथे परमेश्वर रहात नाही.

**प्रश्नकर्ता :** हो ते तर आहे. पण अधूनमधून तर व्हायला हवी न अशी कटकट.

**दादाश्री :** नाही, ही कटकट व्हायलाच नको. कटकटी का व्हायला हवी माणसामध्ये! बाचाबाची कशाला करायला हवी? आणि क्लेश होत असेल तर जमेल का? तुम्हाला किती महिने आवडेल क्लेश होत असेल तर?

**प्रश्नकर्ता :** मुळीच नाही.

**दादाश्री :** एक महिनाभर पण नाही जमणार, नाही का? छान छान जेवायचे, सोन्याचे दागिने घालायचे आणि वरुन बाचाबाची करायची. अर्थात् जीवन जगता येत नाही, त्याची ही कटकट आहे. जीवन जगण्याची कला समजत नाही, त्याची ही भानगड आहे. डॉलर कसे मिळवायचे हिच कला आपणास माहित आहे. त्याचाच सारखा विचार करतो. पण जीवन कसे जगावे याचा विचार नाही केला. विचार केला पाहिजे की नाही?

**प्रश्नकर्ता :** विचार केला पाहिजे. पण सगळ्यांची पद्धत वेग-वेगळी असते ना?

**दादाश्री :** नाही, सगळ्यांची पद्धत वेग-वेगळी नाही, एकच पद्धत असते. डॉलर, डॉलर आणि जेव्हा डॉलर हातात येतात तेव्हा हजार डॉलर तिथे स्टोरमध्ये जाउन खर्चून टाकणार. आणि वस्तू खरेदी करुन घरी आणून ठेवणार. पण मग त्या आणलेल्या वस्तूंना काय बघत रहायचे असते? ते परत जुने होऊन जातात मग परत नवीन आणायच्या. पूर्ण दिवस तोड-जोड, तोड-जोड, दुःख, दुःख आणि दुःख, त्रास त्रास आणि त्रास, अरे जळो, असे कसे जीवन जगायचे? हे शोभते का माणसांना? क्लेश नाही झाला पाहिजे, भांडणं नाही झाली पाहिजे. काहीच नाही झाले पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** पण क्लेश म्हणजे काय?

**दादाश्री :** ओहो.... जसे घरातल्यांसोबत, बाहेरच्यांसोबत, बायकोसोबत

जो वादविवाद (संघर्ष) होतो त्यास क्लेश बोलतात. मन दुखावले गेल्यामुळे एकमेकांशी थोडा वेळ वेगळे राहतात, त्याचे नांव क्लेश. दोन-तीन तास वादविवाद झाल्यावर लगेच एक व्हाल तर हरकत नाही. पण संघर्ष झाल्यावर वेगळे व्हाल तर तो क्लेश म्हटला जाईल. बारा तास वेगळे राहिलात तर पूर्ण रात्र क्लेशातच जाईल.

**प्रश्नकर्ता :** हं...... ही क्लेशची गोष्ट केली ती पुरुषांमध्ये जास्त आहे की स्त्रियांमध्ये जास्त आहे?

**दादाश्री :** क्लेश तर... स्त्रियांमध्ये जास्त असतो.

**प्रश्नकर्ता :** ह्याचे कारण काय?

**दादाश्री :** असे आहे ना, काहीवेळा वादाविवाद होतो त्यामुळे तेव्हा क्लेश निर्माण होतो. क्लेश होणे म्हणजे पटकन जळून विझून जाणे. पुरुष आणि स्त्रीमध्ये क्लेश झाल्यावर पुरुष तर सोडून देणार पण स्त्री त्याला पटकन सोडत नाही आणि क्लेशातून कलह करुन टाकते आणि मग ती तोंड फुगवून फिरत रहाते जसे की आपण तिला तीन दिवस उपाशी ठेवल्या प्रमाणे वागते.

**प्रश्नकर्ता :** तर मग हा कलह दूर करण्यासाठी काय करावे?

**दादाश्री :** आपण क्लेश नाही केले तर कलह होणार नाही, वास्तवात आपणच क्लेश करुन आग लावत असतो. आज जेवण चांगले नाही झाले, आज तर माझ्या तोंडाची चवच गेली, असे काहीतरी बोलून क्लेश उभा करता आणि मग ती कलह करते.

**प्रश्नकर्ता :** मुख्य गोष्ट तर ही आहे की घरात शांती रहायला हवी.

**दादाश्री :** पण शांती राहिल कशी? मुलीचे नांव जरी शांति ठेवले तरी पण शांती राहणार नाही. त्यासाठी तर धर्म समजावा लागेल, घरातल्या सगळ्या सदस्यांना सांगितले पाहिजे की, आपण सर्व घरातली माणसे कोणी कोणाचे वैरी नाही. कोणाचे कोणा बरोबर भांडण नाही. आपल्याला मतभेद करण्याची काहीच गरज नाही. मिळून-मिसळून शांतीपूर्वक खा-प्या आनंदी

रहा, मजा करा, अशाप्रकारे आपल्याला सर्वकाही विचारपूर्वक केले पाहिजे. घरातल्या माणसांबरोबर क्लेश कधीही नाही केला पाहिजे. त्याच घरात रहायचे तर बाचाबाची करण्यात काय अर्थ आहे? कोणाला त्रास देऊन तुम्ही सुखी व्हाल हे शक्यच नाही. आपल्याला तर सुख देऊन सुख घ्यायचे आहे. आपण घरात सुख दिले तरच सुख मिळेल. ती चहा-पाणी पण नीट बनवून देईल, नाहीतर चहा पण नीट बनवणार नाही.

ही तर किती चिंता-संताप! जरा पण मतभेद कमी होत नाहीत. तरी सुद्धा मनात मानतो की मी किती धर्म केले! अरे, घरात मतभेद टळला का? कमी तरी झाला आहे का? चिंता कमी झाली? थोडी फार शांती आली? तेव्हा बोलतात, नाही, पण मी धर्माचे तर केलेच न? अरे, त्याला तू धर्म म्हणतो? धर्म तर अंतरशांती देतो, आधि-व्याधी-उपाधी होऊ देत नाही, त्यास धर्म म्हणतात!

स्वभावा (आत्मा) कडे जाणे यास धर्म म्हणतात. हे तर क्लेश परिणाम सारखे वाढतच जातात!

पत्नीच्या हातातून एवढ्या मोठ्या पंधरा-वीस काचेच्या डिश आणि ग्लास वेर (काचे ची भांडी) पडून फुटले तर. त्यावेळी आपल्यावर काही परिणाम होतो का ?

दु:ख झाले, म्हणून बडबडल्या शिवाय राहत नाही ना! हा रेडियो वाजल्या शिवाय रहातच नाही. दु:ख झाले की रेडियो सुरु, मग तिला पण दु:ख होते. त्यावर ती पण काय बोलते, हं.... जसे काय तुमच्या हातून कधी काही फुटतच नाही. ही समजण्याची गोष्ट आहे की डिश पडतात ना? आपण सांगितले की ते तु फोडून टाक तर फोडेल का ती? नाही फोडणार. मग हे कोण फोडत असेल? ह्या वर्ल्ड मध्ये कोणताही मनुष्य एकही डिश फोडण्याची शक्ति ठेऊ शकत नाही. हा तर सर्व हिशोब पूर्ण होतो आहे. डिश फुटेल तेव्हा आपण तिला विचारले पाहिजे तुला लागले तर नाही ना?!

जर सोफ्यावरुन भांडण होत असेल तर सोफ्याला बाहेर फेकून द्या. हा सोफा तर दहा-वीस हजारांचा असेल. मूर्खा, त्यासाठी भांडण कसले?

ज्याने फाडला त्याच्यावर द्वेष होतो. अरे मुर्खा! फेकून ये. ज्या वस्तूमुळे घरात भांडण लागले, ती वस्तू बाहेर फेकून द्या.

जितके समजेल तितकी श्रद्धा बसत जाईल. तितकेच फळ देईल. हेल्प (मदत) करेल. श्रद्धा बसली नाही तर ते हेल्प पण करणार नाही. म्हणून समजदारीने चाललात तर आपले जीवन सुखी होईल, आणि तिचे जीवन पण सुखी होईल. अरे, तुमची पत्नी तुम्हाला गरमागरम भजी आणि जिलेबी बनवून देत नाही का?!

**प्रश्नकर्ता :** बनवून देते ना?

**दादाश्री :** हो तर मग? तिचे उपकार मानत नाही, कारण की ती आपली पार्टनर आहे. त्यात तिचे कसले उपकार? असे म्हणतात. आपण पैसे आणतो आणि ती आपल्याला हे सर्व बनवून देते, अशी दोघांची पार्टनरशीप चालते. मुले पण पार्टनरशीप मध्ये येतात, काय तिच्या एकटीची थोडेच आहेत?! तिने मुलांना जन्म दिला आहे म्हणून तिच्या एकटीचीच आहेत? दोघांची आहेत मुले, दोघांची की एकटीची?

**प्रश्नकर्ता :** दोघांची.

**दादाश्री :** हं मुलांना जन्म काय पुरुष देणार होते? अर्थात् हे जगत समजण्यासारखे आहे! काही बाबतीत समजण्यासारखे आहे. आणि ते ज्ञानी पुरुष समजावतात, त्यांना काही घेणे-देणे नसते, म्हणून ते समजावतील की, भाऊ, हे एवढे आपल्या हिताचे आहे, तेव्हा मग घरात काही क्लेश कमी होतील, तोड-फोड कमी होतील.

कृष्ण भगवानांनी सांगितले आहे, दोन प्रकारची बुद्धि, अव्यभिचारिणी आणि व्यभिचारिणी. व्यभिचारिणी म्हणजे दुःखच देते आणि अव्यभिचारिणी बुद्धि सुखच देते, दुःखातून सुख शोधून काढते. आणि हे तर बासमती तांदुळात खडे घालून खातील मग. इथे अमेरिकामध्ये खायचे सामान किती चांगले, शुद्ध तूप मिळते, दही मिळते किती छान जेवण मिळते, जीवन सरळ आहे, तरीही जीवन जगता येत नाही म्हणून मार खातात ना लोक.

आपल्या हिताचे काय आहे त्याचा तरी विचार करायला हवा ना!

लग्न झाले त्या दिवसाचा आनंद आठवणे हितकारी की, विधुर झालो त्या दिवसाचा शोक आठवणे हितकारी!

आम्हाला तर लग्नाच्या वेळेसच विधुर होण्याचे विचार आले होते ना!! लग्नाच्या वेळेस नवीन फेटा बांधला होता. त्या दिवसात फेटे घालत असत. पण नंतर फेटा सरकल्यावर मनात विचार आला की लग्न करायला तर बसलो आहे, दोघांचे मिलन होत आहे, पण आता दोघांपैकी एक तर विधुर होणारच ना!

**प्रश्नकर्ता :** त्या वयात तुम्हाला असे विचार आले होते?

**दादाश्री :** का नाही येणार? एक चाक तर मोडणारच ना? लग्न केले म्हणजे वैधव्य आल्याशिवाय राहणार नाही.

**प्रश्नकर्ता :** पण लग्नाच्या वेळेस तर जोश चढलेला असतो, किती मोह असतो, अशावेळी वैराग्याचा विचार कुठून येईल?

**दादाश्री :** पण त्यावेळी विचार आला की लग्न झाल्यानंतर विधुरपणा तर येणारच. दोघांपैकी एकाला तरी वैधव्य येणारच. तिला तरी येईल नाहीतर मला येईल.

सर्वांच्या उपस्थितीत, सूर्यनारायणाच्या साक्षीने ब्राह्मणाच्या साक्षीने लग्न केले तेव्हा ब्राह्मणाने सांगितले की समय वर्ते सावधान(शुभ मंगल सावधान) तर तुला सावधही होता येत नाही? वेळेनुसार सावधान व्हायला हवे, भटजी बोलतात की समय वर्ते सावधान ते तर भटजीनांच समजते, पण लग्न करणाऱ्याला कसे समजेल? सावधानचा अर्थ काय? तर म्हणतात, बायको उग्र (क्रोधीत) झाली असेल तर तू थंड होउन जा, सावध हो. समय वर्ते सावधान अर्थात् परिस्थिती अनुसार सावध राहणे आवश्यक आहे. तरच संसारात लग्न करावे. ती जर संतापली असेल आणि आपणही संतापलो तर त्याला बेसावधपणा म्हणायचा. ती जेव्हा संतापेल तेव्हा आपल्याला शांत रहायचे. सावध राहण्याची गरज नाही का? आम्ही तर सावध होतो, फट पडू दिली नाही. मतभेद पडायला लागले की लगेचच वेल्डिंग करुन देत होतो.

**प्रश्नकर्ता :** क्लेश होण्याचे मुख्य कारण काय आहे?

**दादाश्री :** भयंकर अज्ञानता! त्यामुळे संसारात जगता येत नाही. मुलाचा बाप होता येत नाही. पत्नीचा पती होता येत नाही. जीवन जगण्याची कलाच येत नाही. हे तर सुख असून सुद्धा सुख भोगू शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** पण वाद होण्याचे कारण स्वभाव नाही जुळत त्यामुळे?

**दादाश्री :** अज्ञानता आहे त्यामुळे. संसार त्याचेच नांव की जिथे कोणाचे स्वभाव कोणाबरोबर जुळतच नाही! हे ज्ञान ज्यानां मिळाले त्यांच्याकडे तर एकच रस्ता आहे, एडजस्ट एवरीव्हेर.

जिथे क्लेश आहे तिथे भगवंताचा वास रहात नाही. म्हणून आपण भगवंताला सांगतो की, साहेब तुम्ही मंदिरातच रहा, माझ्या घरी येऊ नका! आम्ही मंदिर बनवू पण तुम्ही घरी येवू नका. जिथे क्लेश नाही तिथे भगवंताचा वास नक्की आहे त्याची तुम्हाला मी गॅरेन्टी देतो. क्लेश झाला की भगवंत निघून जातात. आणि भगवंत निघून गेल्यावर लोक आपल्याला काय सांगतात की धंद्यात काही बरकत होत नाही, अरे भगवंत निघून गेले त्यामुळे बरकत होत नाही. भगवंत जोपर्यंत आहेत तोपर्यंत धंद्यात फायदा वैगेरे सर्व काही होत असतो. तुम्हाला आवडतो का क्लेश?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** तरी पण होऊन जातो ना?

**प्रश्नकर्ता :** कधी-कधी.

**दादाश्री :** तर ही दिवाळी पण कधी कधीच येते ना, दररोज थोडी येते!

**प्रश्नकर्ता :** नंतर पंधरा मिनिटात थंड होऊन जाते. वादविवाद बंद होऊन जातात.

**दादाश्री :** आपल्यातून क्लेश काढून टाका. ज्यांच्या घरात क्लेश आहे, तिथून मनुष्यपणा निघून जातो. खूप पुण्याईने मनुष्यजीवन प्राप्त होते. ते ही हिन्दुस्थानातील मनुष्यपणा, आणि ते ही पुन्हा इथे (अमेरिकेत), हिन्दुस्थानात शुद्ध तूप शोधतात तरी सुद्धा मिळत नाही आणि तुम्हाला तर

रोज शुद्ध तूपच मिळत असते. अशुद्ध शोधले तरी मिळत नाही. किती पुण्यशाली आहात! परंतु पुण्याचा पण, दुरुपयोग होतो मग.

आपल्या घरात क्लेशरहीत जीवन जगले पाहिजे. इतकी तर कुशलता यायला हवी ना. दुसरे काही नाही आले तरी आपण त्यांना समजावले पाहिजे की, क्लेश झाला तर आपल्या घरातून परमेश्वर निघून जातील. त्यासाठी तू नक्की कर की आपल्याला क्लेश करायचे नाहीत. आणि तुम्ही पण नक्की करा की क्लेश करायचे नाहीत. नक्की केल्या नंतर ही क्लेश होऊन जात असेल तर समजावे की, हे आपल्या सत्ते बाहेरचे घडले आहे. तेव्हा मग तो क्लेश करत असेल तरी ही आपण पांघरुन घेऊन झोपून जावे. तर तोही थोड्यावेळानी झोपून जाईल. पण जर आपणही समोर वाद घालू लागलो तर?

क्लेश नाही होणार असे नक्की करा ना! तीन दिवसासाठी तरी नक्की करुन बघा ना! प्रयोग करण्यात काय हरकत आहे? तीन दिवसांचे उपवास करता ना तब्बेतीसाठी? तसेच हे पण नक्की करुन तर बघा. घरात सर्वांनी एकत्र मिळून नक्की करा की, दादाश्री जे सांगत होते, ती गोष्ट मला आवडली आहे. म्हणून आपण आजपासून क्लेश करण्याचे सोडूया! मग पहा.

**प्रश्नकर्ता :** इथे अमेरिकेत बायका पण नोकरी करतात त्यामुळे स्त्रियांना जरा जास्त पावर आली आहे, म्हणून हसबंड-वाईफ (पति-पत्नी) मध्ये जास्त कीचकीच होते.

**दादाश्री :** पावर आली आहे हे तर चांगले झाले ना उलट, आपण तर समजावे की ओहोहो! तसे मग पावर विनाचे होतो तर पावर आली ते चांगलेच झाले आपल्यासाठी! संसारगाडा चांगला चालेल ना? ह्या गाड्यांचे बैल ढिले असलेले बरे की पावरवाले?

**प्रश्नकर्ता :** पण खोटी पावर दाखवली तर खराबच होणार ना? पावर चांगल्यासाठी वापरत असेल तर ठीक आहे.

**दादाश्री :** असे आहे, जर पावरला मान्य केले नाही, तर तिची पावर

भिंतीवर जाऊन आदळेल. असा रुबाब मारते नि तसा रुबाब मारते पण आपल्यावर त्याचा काही परिणाम झाला नाही तर तिची पावर भिंतीवर आदळून परत तिलाच लागेल.

**प्रश्नकर्ता :** आपल्या बोलण्याचा अर्थ असा आहे की आम्ही बायकांचे ऐकायचे नाही.

**दादाश्री :** ऐका, सर्व चांगल्याप्रकारे ऐका, आपल्या हिताची गोष्ट असेल तर सर्व काही ऐका आणि पावर जर आपटत असेल, तर त्यावेळी मौन रहाचये. ते आपण पाहून घ्यायचे की किती प्यालेली (भडकलेली) आहे. पिल्या प्रमाणे पावर वापरेल ना?

**प्रश्नकर्ता :** बरोबर आहे. त्याच प्रमाणे पुरुष पण खोटी पावर दाखवत असेल तर?

**दादाश्री :** तेव्हा आपण समजून जायचे. हं.... आज जरा बिनसलेले आहे पण हे मनात बोलावे. तोंडावर काही बोलू नये.

**प्रश्नकर्ता :** हं.... नाहीतर आणखीन बिनसतील.

**दादाश्री :** म्हणे, आज बिनसले आहे, असे नाही व्हायला पाहिजे. किती सुंदर... दोन मित्र असतील, तर ते आपापसात असे वागतील का? मग त्यांची मैत्री कशी टिकणार? असे केल्याने त्यांची मैत्री टिकणार का? स्त्री-पुरुष म्हणजे मैत्रीपूर्ण घर चालवायचे आहे आणि काय ही हालत करुन टाकली आहे. काय ह्यासाठीच लोक आपल्या मुलींचे लग्न ग्रीनकार्डवाल्यांबरोबर करत असतील का? तर मग हे शोभते का आपल्याला? तुम्हाला कसे वाटते? नाही ना शोभत आपल्याला! संस्कारी कोणाला म्हणावे? ज्यांच्या घरात क्लेश असेल त्यांना संस्कारी म्हणावे की क्लेश नाही होत त्यांना?

एक तर घरात कधी क्लेश नाही झाला पाहिजे आणि होत असेल तर वळवून घेतला पाहिजे. जर क्लेश होईल असे असेल, आपल्याला वाटले की आता पेटणार आहे त्या आधीच पाणी टाकून थंड करून टाकावे. पूर्वीसारखे क्लेशमय जीवन जगण्यात काय फायदा. याचा अर्थच काय?

क्लेशमय जीवन नाही असले पाहिजे ना? सोबत काय घेऊन जाणार आहे. घरात एकत्र खायचे प्यायचे आणि कटकट का म्हणून करावी? जर इतर कोणी नवऱ्याबद्दल काही बोलले तर बायकोला राग येतो की माझ्या नवऱ्याला असे बोलतात आणि स्वतः नवऱ्याला बोलत असते की तुम्ही असे आहात नी तुम्ही तसे आहात. असे असायला नको. नवऱ्याने ही असे नाही केले पाहिजे. तुमच्यात क्लेश असेल, तर मुलांच्या जीवनावर परिणाम होईल. चिमुकली मुले, त्यांच्यावर दुष्परिणाम होतो म्हणून क्लेश नसावा. क्लेश जाईल तेव्हा मग घरातली मुले पण चांगली होतील. ही तर मुले सर्व बिगडून गेली आहेत!

आम्हाला तर ज्ञान प्राप्त झाले तेव्हापासून, वीस वर्षांपासून तर क्लेश होतच नाही पण त्याआधी वीस वर्षापूर्वीही क्लेश नव्हता. पहिल्यापासून आम्ही क्लेशला तर काढूनच टाकले होते, कुठल्याही परिस्थितीत क्लेश करण्यासारखे हे जगत नाही.

आता तुम्ही विचारपूर्वक कार्य करा ना! किंवा दादा भगवानांचे नांव घ्या. मी सुद्धा दादांचे नांव घेऊन सर्व कार्य करत असतो. दादा भगवानांचे नांव घ्याल तर लगेच तुमच्या मनाप्रमाणे होऊन जाईल.

## ३. पति-पत्नीत मतभेद

आपल्याला तर मुख्यतः क्रोध-मान-माया-लोभ जातील, कमी होतील असे पाहिजे. आपल्याला इथे पूर्णता प्राप्त करायची आहे, प्रकाश करायचा आहे. इथे अंधारात कुठपर्यंत रहायचे? तुम्ही क्रोध-मान-माया-लोभची निर्बलता, मतभेद पाहिली आहे का?

**प्रश्नकर्ता :** खूपच.

**दादाश्री :** कुठे? कोर्टात?

**प्रश्नकर्ता :** घरात, कोर्टात, सर्व ठिकाणी.

**दादाश्री :** घरात तर काय असेल? घरात तर तुम्ही तिघेजण, तिथे मतभेद कसले? दोन-चार, किवां पांच, मुली आहेत असे तर काही नाही. तुम्ही तिघेजण त्यात कुठले आले मतभेद?

**प्रश्नकर्ता :** नाही, पण तिघातच भरपूर मतभेद आहेत.

**दादाश्री :** ह्या तिघातपण?! असे!

**प्रश्नकर्ता :** जीवनात जर कॉन्फलिक्ट (मतभेद) नसतील, तर जीवनाची मजाच येणार नाही!

**दादाश्री :** ओहोहो.... असे होय. त्यामुळे मजा येते का? तर मग रोजच असे करा ना! हे कोणी शोधून काढले? कुठल्या बुद्धिवंताचा शोध आहे हा? कॉन्फलिक्टची मजा घ्यायची असेल तर मग रोजच मतभेद केले पाहिजे!

**प्रश्नकर्ता :** हे तर नाही आवडणार.

**दादाश्री :** हे तर लोकांनी स्वत:चे रक्षण केले आहे! मतभेद स्वस्त पडेल की महाग? थोड्या प्रमाणात होतात की जास्त प्रमाणात?

**प्रश्नकर्ता :** थोड्या प्रमाणात पण होतात आणि जास्त प्रमाणातही होतात.

**दादाश्री :** कधी दिवाळी आणि कधी होळी, ह्यात मजा येते की मजा निघून जाते?

**प्रश्नकर्ता :** हे तर संसार चक्र असे आहे.

**दादाश्री :** नाही, या लोकांना बहाणे बनविण्यासाठी छान भेटले आहे. संसार चक्र असे आहे असला बहाणा बनवतात पण हे बोलत नाही की माझी निर्बलता आहे.

**प्रश्नकर्ता :** निर्बलता तर आहेच. निर्बलता आहे म्हणून तर त्रास होत आहे ना!

**दादाश्री :** हो बस, म्हणून लोक संसाराचे चक्र सांगून ह्यावर पांघरून घालतात. आणि झाकल्यामुळे हे तसेच उभे राहिले आहे. ही निर्बलता काय सांगते की जोपर्यंत मला ओळखणार नाही, तोपर्यंत मी जाणार नाही. संसार कुठेही स्पर्शत नाही. संसार निरपेक्ष आहे. सापेक्ष पण आहे आणि निरपेक्ष

पण आहे. हे आपण असे केले तर असे आणि असे नाही केले तर काही ही नाही, काही घेणे-देणे नाही. मतभेद ही तर केवढी मोठी निर्बलता आहे.

**प्रश्नकर्ता :** पण घरात मतभेद तर होतच असतात, हा तर संसार आहे ना!

**दादाश्री :** आपली लोक तर बस, रोज भांडणे होत असतील तरी म्हणतात, हे तर चालायचेच! पण अश्याने डेवलपमेन्ट (प्रगती) होत नाही. कशाने होते? कशाने होते? असे का बोलतात. काय होत आहे? हे सर्व शोधून काढायला हवे.

काही वेळा घरात जर मतभेद झाले तर कोणते औषध लावता? औषधाची बाटली ठेवली आहे का?

**प्रश्नकर्ता :** मतभेदाचे काही औषध नाही.

**दादाश्री :** अरे, काय बोलता? मग तुम्ही ह्या रुममध्ये बोलत नाही, पत्नी त्या रुममध्ये बोलत नाही, तर असे अबोला ठेवून झोपून रहायचे ? औषध लावल्या शिवायच? मग हे कश्या पद्धतीने मिटत असेल ? घाव भरत असतील का? मला हे सांगा की औषध लावल्याशिवाय घाव बरे कसे होणार? सकाळपर्यंत सुद्धा हे घाव बरे होत नसतात. सकाळी चहाचा कप ठेवताना असे जोराने आपटेल. तेव्हा तुम्हीही समजाल की रात्रीचा घाव अजूनही भरलेला नाही. होते की नाही होत असे ? तशी ही गोष्ट काही आपल्या अनुभवाबाहेरची नाहीच आहे? आपण सर्वे सारखेच आहोत! अर्थात् असे का झाले की अजूनपर्यंत मतभेदाचे घाव तसेच पडले आहेत.

पण रोजच्या रोज हा घाव तसाच रहातो. खाच पडल्यामुळे घाव जात नाही ना, घाव पडलेला तर राहतोच ना! म्हणूनच खाच पडू देऊ नये. कारण की आता आपण खाच पाडली (त्रास दिला) असेल ना, तर म्हातारपणी बायको आपल्याला खाच पाडेल! आता मनातल्या मनात म्हणेल की तो बलवान आहे म्हणून काही काळापर्यंत चालवून घेईल. नंतर तिची वेळ आली की आपल्याला चांगल्याप्रकारे समजावून देईल. त्याकरता व्यवहार असा ठेवा की ती आपल्याला प्रेम करेल. आपणही तिच्यावर प्रेम करावे.

भुलचूक तर सर्वांचीच होत असते ना! भुलचूक होत नाही का? भुलचूक झाली तर त्यात मतभेद का करायचे? मतभेद करायचे असेल तर बलवानासोबत भांडायचे ज्याने आपल्याला लगेच उत्तर मिळून जाईल. इथे तर लगेच उत्तर कधी मिळतच नाही. म्हणून दोघांनी समजून घ्यायचे. असे मतभेद करु नका. कोणी मतभेद पाडले तर आपण म्हणावे दादाजी काय सांगतात, मग असे का बिगडवायचे?

मतच नाही ठेवले पाहिजे. अरे! दोघांनी लग्न केले मग मत वेगळे कशासाठी? दोघांनी लग्न केले मग मतं वेगळे ठेवयाचे असतात का?

**प्रश्नकर्ता :** ठेवत नाही, पण ठेवले जातात.

**दादाश्री :** ते आपण काढून टाकावे. वेगळे मत ठेवायचे नाही. नाहीतर लग्नच नव्हते करायचे. लग्न केले तर एक व्हा.

अर्थात् हे जीवन जगता ही आले नाही! व्याकुळतेने जीवन जगत आहात! तू एकटा आहेस का? असे विचारले तर सांगेल, नाही, विवाहीत आहे. अरे मुर्खा! वाईफ आहे तरीही व्याकुळता नाही मिटली! व्याकुळता मिटायला नको का! ह्या सर्वांचा विचार तर मी आधीच केला होता. लोकांनी पण ह्याचा विचार करायला नको का? खूप मोठे विशाल जगत आहे. पण स्वतःच्या खोलीच्या आत आहे इतकेच जगत मानले आहे. अरे तिथे ही जगत आहे असे मानत असेल तरीही ठिक आहे. पण तिथेही वाईफसाबत लठ्ठेबाजी चालूच असते.

**प्रश्नकर्ता :** भांड्याला भांडे लागले तर आवाज होणारच पण नंतर शांतता होते!

**दादाश्री :** आवाज आल्यावर मजा येते खरी! 'अक्कल' चा थेंब सुद्धा नाही असेही बोलतात.

**प्रश्नकर्ता :** ती तर परत असेही बोलते की तुमच्याशिवाय इतर कुणीही मला आवडत नाही.

**दादाश्री :** हो, तसे ही बोलते!

**प्रश्नकर्ता :** पण घरात तर भांडी वाजणारच ना?

**दादाश्री :** रोज-रोज भांड्याला भांडे लागले तर कसे चालेल? हे समजत नाही म्हणून तर हे सर्व चालले आहे. जागृत असेल त्याला तर एक जरी मतभेद झाले तरी रात्रभर झोप येणार नाही! ह्या भांड्यांना (माणसांना) तर स्पंदने आहेत, म्हणून रात्री झोपता झोपता ही स्पंदन करत असतात की हे तर वाकडे आहेत, उलटे आहेत, नालायक आहेत, काढून टाकण्यासारखे आहेत. आणि त्या भांड्यांना अशी काही स्पंदने आहेत का ? आपले लोक तर समजल्याशिवाय हो ला हो करुन बोलतील की दोन भांडी एकत्र आहेत म्हणून तर वाजतील! अरे घनचक्कर, आपण काही भांडी आहोत का असे वाजू? ह्या दादांना कोणीही, कधीही वाजताना (वाद करताना) पाहिले नसेल! स्वप्न ही आले नसेल तसे!! वाजणे कसले? वाजणे काही इतर कोणाची जोखीमदारी आहे? हे तर आपल्या स्वतःच्या जोखीमदारी वर आहे. चहा लवकर नाही आला तर आपण टेबलवर तीन वेळा ठोकतो ही जोखीमदारी कोणाची? त्यापेक्षा आपण बावळटा सारखे गप्प बसून रहावे. चहा मिळाला तर ठिक, नाहीतर निघा ऑफिससाठी. त्यात काय वाईट आहे ? चहाचा पण काही काळ तर असेल ना? हे जगत नियमाच्या बाहेर तर नसेल ना? म्हणून आम्ही म्हटले आहे की *'*व्यवस्थित शक्ति'*! चहाची वेळ होईल तेव्हा चहा मिळेल. तुम्हाला ठोकावे नाही लागणार तुम्ही स्पंदन उभे नाही केले तरी चहा येऊन ऊभा राहिल आणि स्पंदन उभे कराल तरी ही चहा येईल. परंतु स्पंदनाने तर वाईफच्या वहीखात्यात हिशोब जमा होईल की तुम्ही त्यावेळेला टेबल ठोकला होता ना!

घरात वाइफसोबत मतभेद झाले तर तिचे समाधान करता येत नाही, जास्त मुलांबरोबर मतभेद झाले तर त्यांचे समाधान करता येत नाही म्हणून तुम्ही गुंतत जाता.

**प्रश्नकर्ता :** नवरा तर असेच म्हणेल ना, की 'वाइफ' समाधान करेल, मी करणार नाही!

**दादाश्री :** हंअ, म्हणजे लिमिट पूर्ण झाली, 'वाइफ' समाधान करेल

*व्यवस्थित शक्ति = रीझल्ट ऑफ सायन्टिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स. म्हणजेच वैज्ञानिक संयोगिक पुरावे एकत्र होवून आलेला परिणाम.

आणि आपण नाही करणार तर मग आपली 'लिमिट' झाली पूर्ण. पुरुष असेल तर तो असे बोलेल की 'वाइफ' खुश होईल असे करुन गाडी पूढे चालू करुन देईल आणि तुम्ही तर पंधरा-पंधरा दिवस, महिना-महिनापर्यंत गाडी तशीच ठेवाल, हे नाही चालायचे. जोपर्यंत समोरच्याच्या मनाचे समाधान नाही होत तोपर्यंत तुम्हाला अडचण येणार म्हणून समाधान करावे.

घरात असे मतभेद होत असतील तर कसे चालेल ? बायको म्हणेल की 'मी तुमची आहे' आणि नवरा बोलेल की 'मी तुझा आहे' मग मतभेद का ? जस-जसे तुमच्या दोघात 'प्रोब्लेम' वाढत जाईल तसे तुम्ही वेगळे होत जाल. 'प्रोब्लेम' 'सॉल्व' झाल्यावर वेगळे होणार नाही. वेगळेपणात दुःख आहे. 'प्रोब्लेम' तर सर्वांनाच होणार, तुम्हाला एकट्याला होत आहे असे नाही. जेवढ्यांनी लग्न केले, त्यां सर्वांना 'प्रोब्लेम' उभे झाल्या शिवाय रहात नाही.

बायकोसोबत मतभेद होत असतो, मुर्खाला ! जिच्या बरोबर.... डबल बेड असतो की एक अंथरुण असते ?

**प्रश्नकर्ता :** नाही, माफ करा. एकच असते.

**दादाश्री :** तर मग तिच्या बरोबर भांडण झाले आणि तिने रात्री लाथ मारली तर काय करशील ?

**प्रश्नकर्ता :** खाली.(पडेल)

**दादाश्री :** तर मग तिच्याबरोबर एकता ठेवावी. वाइफबरोबर पण मतभेद झाले, तिथे पण एकता राखली नाही तर मग आणखी कुठे राखणार ? एकता म्हणजे काय की कुठेही मतभेद होणार नाही ! ह्या एका व्यक्तीसोबत नक्की करा की तुझ्यात नि माझ्यात मतभेद असणार नाहीत, इतकी एकता राहिली पाहिजे. एवढी एकता ठेवली आहे का तुम्ही ?

**प्रश्नकर्ता :** असा विचार कधी केला नव्हता. पहिल्यांदा असा विचार करतो आहे.

**दादाश्री :** हो, असा विचार करावा लागेल ना ? खूप खूप विचार केल्यानंतर भगवान मोक्षला गेले !

बातचीत करा ना! त्याने काही खुलासा होईल. हे तर योग आला आलो म्हणून एकत्र आलो, नाहीतर एकत्र आलो नसतो!! म्हणून काही बातचीत करा न! त्यात काय हरकत आहे? आपण सर्व एकच आहोत. तुम्हाला वेगळेपण वाटते, कारण की भेदबुद्धि आहे त्यामुळे माणसांना वेगळेपणा वाटतो बाकी सर्व एकच आहोत. माणसांना भेदबुद्धि असते ना! वाइफसोबत तर भेदबुद्धि होत नाही ना?

**प्रश्नकर्ता :** हो, तिथेच होत असते!

**दादाश्री :** वाइफसोबत भेद कोण पाडतो? तर बुद्धिच!

बायको आणि नवरा दोघे जेव्हा शेजाऱ्यांसोबत भांडतात तेव्हा कसे अभेद होऊन भांडतात? दोघेजण असे हात करुन, तुम्ही असे आणि तुम्ही तसे. दोघेजण असे हात करतात. तेव्हा आपल्याला वाटते की, ओहोहो! ह्या दोघात केवढी एकता? ही कॉर्पोरेशन अभेद आहे, असे आपल्याला वाटते. आणि नंतर घरी जाऊन भांडतील तेव्हा काय बोलतील? घरात दोघे भांडतात की नाही भांडत? कधी तरी तर भांडत असतील की नाही ? हे कॉर्पोरेशन आतल्या आत जेव्हा भांडतील ना, तू अशी नी तुम्ही असे. तू अशी नी तुम्ही असे, मग घरात जोरदार भांडण होते ना! तेव्हा तर सांगता तू जा, इथून जा, आपल्या घरी (माहेरी) जा, मला नकोच आहेस तू! आता हा गैरसमज नाही का? काय वाटते तुम्हाला ? त्यांच्यातली अभेदता तुटून गेली आणि भेद उत्पन्न झाला. अर्थात् पत्नीसोबतही तुझे-माझे होऊन जाते. तू अशी आहेस नी तू तशी आहेस! तेव्हा ती म्हणेल तुम्ही कुठे सरळ आहात ? अर्थात् घरात ही तू आणि मी होऊन जाते.

मी आणि तू, मी आणि तू, मी आणि तू! जे पहिले एक होते, आम्ही दोघे एक आहोत, आम्ही असे आहोत, आम्ही तसे आहोत. आमचेच आहे हे, त्यातून तू आणि मी झाले. आता तू आणि मी झाले म्हणून ओढाताण सुरु होते. ही ओढाताण कुठपर्यंत पोहचते? थेट हळदीघाटीची लढाई सुरु होते. सर्वनाशाला निमंत्रित करण्याचे साधन म्हणजे ही ओढाताणी! म्हणून ओढाताणी तर कोणाबरोबरही होऊ देऊ नका.

रोज माझी वाइफ, माझी वाइफ बोलत असतो आणि एके दिवशी

वाइफने आपले कपडे पतीच्या बॅगत ठेवले. तर दुसऱ्या दिवशी पती काय बोलेल? माझ्या बॅगेत तू साड्या ठेवल्याच का?! हे आबरुदारांची मुलं! तिच्या साड्या ह्याला खातात का! पण त्याचे स्वत:चे वेगळे अस्तित्व आहे ना! अर्थात् वाइफ आणि हजबंड, ते तर बिझनेसमुळे (लग्नामुळे) एक झाले, कॉन्ट्रेक्ट आहे हा. तर वेगळे अस्तित्व मिटून जाईल का? अस्तित्व वेगळेच राहते. 'माझ्या पेटीत साड्या का ठेवतेस' असे बोलता की नाही बोलत?

**प्रश्नकर्ता :** बोलतो, बोलतो.

**दादाश्री :** हा तर कलह करतो की माझ्या बॅगमध्ये तुझ्या साड्या ठेवल्याच का? ह्यावर पत्नी बोलते की, कधीतरी ह्यांच्या बॅगमध्ये काही ठेवले तर असे ओरडतात. जळो, नवरा निवडण्यात माझीच चुक झाली वाटते. असा पती कुठून मिळाला? पण आता काय करणार? खुंटीला बांधले गेलो आहे! 'मेरी' (परदेशी स्त्री) असती तर दुसऱ्या दिवशी निघून गेली असती, पण इंडियन कशी काय जाणार? खुंटीला बांधलेल्या! जिथे भांडण करण्याची जागाच नाही, स्पेसच नाही, अश्या ठिकाणी भांडण केले तर भांडण करण्याच्या जागेवर तर मारुनच टाकतील न ही लोक!

अरे, नाही तर जवळ-जवळ बॅगा ठेवलेल्या असतील तरी म्हणतील, तू तुझी बॅग इथून उचल. अरे मेल्या, विवाहित आहेस, लग्न केले आहेस, म्हणजे एक आहात की नाही?! आणि पुन्हा लिहणार काय? अर्धांगिनी. मुर्खा, आहेस तू?! मग अर्धांगिनी कशाला लिहीतोस? ह्यात अर्धा अंग नाही? या बॅगमध्ये ! आपण कोणाची मस्करी करत आहोत, पुरुषांची की स्त्रियांची? असे बोलता न? अर्धांगिनी नाही म्हणत?

**प्रश्नकर्ता :** बोलतो न.

**दादाश्री :** आणि बोलून पुन्हा असे पलटतात. स्त्रिया दखल करत नाही. स्त्रियांच्या बॅगेत जर कधी आपले कपडे ठेवले असेल, तर दखल नाही करत आणि ह्याला तर खूप अहंकार, नेहमी तोऱ्यातच असतो. एकदम विंचूसारखा, जरा काही झाले की पटकन नांगी मारून देईल.

ही तर माझी आपबीती सांगतो आहे हं. माझी आपबीती सांगितली तर तुम्हा सर्वांना समजेल की ह्यांच्यावर सुद्धा ही परिस्थिती आली होती. तुम्ही तर असे सरळ सरळ कबूल करणार नाही, हे तर मी कबुल करतो.

**प्रश्नकर्ता :** आपण बोलता, तेव्हा सगळ्यांना स्वत:चेही आठवते आणि ते कबूलही करतात.

**दादाश्री :** नाही तुम्ही कबूल करत नाही, पण मी तर कबूल करतो की माझ्यावर ही परिस्थिती आली होती, असे घडले होते की नाही? अरे, नांगी मारता तर कशी मारता, की तू तुझ्या घरी चालती हो. असे बोलता. अरे मेल्या, ती गेली तर तुझी काय दशा होईल? ती तर ह्या कर्माने बांधलेली आहे. कुठे जाईल बिचारी? पण हे जे तू बोलतो आहेस ते व्यर्थ नाही जाणार, त्याने तिच्या हृदयावर घाव पडतील, नंतर तो घाव तुझ्यावर पडेल. मुर्खा, ही कर्मे भोगावी लागतील. हे तर तू असे समजतो की आता कुठे जाणार आहे ती? असे बोलू नये. आणि असे बोलत असाल तर ती चुकच म्हटली जाईल ना! थोडेफार टोमणे तर तुम्ही सर्वांनी मारलेले की नव्हते मारले?

**प्रश्नकर्ता :** हो मारले आहेत, सर्वांनी मारले आहेत. ह्यात अपवाद नाही. प्रमाण कमी-जास्त असेल, पण अपवाद नसेल.

**दादाश्री :** तर असे आहे सारे, आता ह्या सगळ्यांना शहाणे बनवायचे आहे, बोला आता हे कसे शहाणे बनतील? पहा फजिती, फजिती! एरंडेल तेल प्यालेत अशी तोंड झाली आहेत! छान छान बासुंदी आणि छान छान जेवण जेवतात, तरीही एरंडेल तेल पिल्यासारखे तोंड दिसत आहे. एरंडेल तेल तर महाग झाले आहे, कुठून आणून पिणार? पण हे तर असेच, एरंडेल तेल प्यायलासारखे तोंड दिसतात.

**प्रश्नकर्ता :** घरात मतभेद संपवण्यासाठी काय करावे?

**दादाश्री :** मतभेद का होतात, याचा आधी शोध घ्यावा. कधी असे मतभेद होतात का की, एक मुलगा आहे आणि एक मुलगी आहे, तर मग दोन्ही मुलगे का नाहीत, ह्यावर मतभेद होतात का?

**प्रश्नकर्ता :** नाही, तसे तर छोट्या छोट्या गोष्टीवरच मतभेद होतात.

**दादाश्री :** अरे, छोट्या छोट्या गोष्टीवर मतभेद होतात, हा तर इगोइझम (अहंकार) आहे. म्हणून जेव्हा ती बोलेल की 'असे आहे', तेव्हा तुम्ही बोला, 'बरोबर आहे.'असे बोललात तर मग काही होणार नाही. पण आपण तिथे आपली अक्कल वापरतो. अक्कलशी अक्कल भांडते म्हणून मतभेद होतात.

**प्रश्नकर्ता :** 'बरोबर आहे' असे तोंडाने बोलण्यासाठी आम्ही काय करायला हवे? आम्ही असे बोलू शकत नाही, हा अहम् कसा दूर करावा ?

**दादाश्री :** असे बोलू शकत नाही, खरे आहे तुमचे. ह्यासाठी काही दिवस प्रेक्टिस करावी लागेल. मी सांगितलेले उपाय करण्यासाठी थोडे दिवस प्रेक्टिस करा ना! त्यानंतर ते फिट होणार. एकदम नाही होणार.

**प्रश्नकर्ता :** मतभेद का होतात? ह्याचे कारण काय?

**दादाश्री :** मतभेद होतात, तेव्हा हा समजतो की मी अक्कलवाला आणि ती समजते की मी अक्कलवाली, अक्कलेचे बारदान! विकायला गेलात तर चार आणे पण मिळणार नाही! त्यापेक्षा आपण शहाणे होऊन जा, तिच्या अक्कलेला आपण बघावे की ओहोहो.... किती अक्कलवाली आहे! तेव्हा मग ती पण शांत होऊन जाईल. पण हे तर आपण ही अक्कलवाले आणि ती ही अक्कलवाली, अक्कलच जिथे भांडू लागेल, तिथे काय होणार मग?!

तुम्हाला मतभेद जास्त होतात की त्यांना जास्त होतात?

**प्रश्नकर्ता :** त्यांना जास्त होतात.

**दादाश्री :** ओहोहो! मतभेद म्हणजे काय? मतभेद याचा अर्थ तुम्हाला समजावतो. हा रस्सी-खेच चा खेळ होतो न, तो पाहिलाय तुम्ही ?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** दोन-चार जण ह्या बाजूला खेचतील तर दोन-चार जण त्या बाजूला खेचतील. मतभेद म्हणजे रस्सीखेच. अर्थात् आपल्याला हे

पहायचे आहे की घरात बायको जास्त खेचते आहे आणि आपण पण जोरात खेचणार, दोघेही खेचणार तर मग काय होणार?

**प्रश्नकर्ता :** तुटून जाणार.

**दादाश्री :** आणि तुटल्यावर गाठ बांधावी लागते. तर गाठ बांधून चालवावे, लागेल त्यापेक्षा अखंड ठेवाल तर काय वाईट आहे? अर्थात तिने जास्त खेचले तर आपण सोडून द्यावे.

**प्रश्नकर्ता :** पण दोघांपैकी सोडणार कोण?

**दादाश्री :** समंजस, ज्याला अक्कल जास्त आहे तो सोडून देणार आणि कमी अक्कलवाला खेचल्याशिवाय राहणारच नाही ना. म्हणजे आपण अक्कलवाले सोडून देऊ. सोडायचे, पण एकदम नाही सोडून द्यायचे. एकदम सोडून दिले तर समोरचा पडेल. त्यासाठी हळू हळू हळू हळू सोडायचे. माझ्या बरोबर जर कोणी खेचाखेची केली तर मी हळू हळू सोडून देतो, नाहीतर पडून जाईल बिचारा. आता तुम्ही सोडून द्याल असे? आता सोडता येईल न? सोडून द्याल न? सोडून द्या, नाहीतर रस्सीला गाठ बांधून चालवावे लागेल. रोज रोज गाठ बांधणे हे काय बरे वाटते? गाठ तर बांधावीच लागेल न! ती रस्सी तर चालवावीच लागते न! तुम्हाला काय वाटते? घरात मतभेद करायचे असतात का? एक अंश पण झाले नाही पाहिजे!! घरात जर मतभेद होत असतील तर यू आर अन्फिट (अयोग्य), जर हजबंड असे करेल तर तो अन्फिट फॉर हजबंड आणि वाइफ असे करत असेल तर ती अन्फिट फॉर वाइफ.

**प्रश्नकर्ता :** पति-पत्नीच्या भांडणांचे मुलांवर काय परिणाम होतात ?

**दादाश्री :** ओहोहो! खूप वाईट परिणाम होतात. इतकेसे लहान बाळ असेल, ते पण असे पहात रहाते. पप्पा माझ्या मम्मीला खूप ओरडतात. पप्पाच खराब आहेत. पण तो बोलत नाही. त्याला माहित आहे की बोललो तर मारतील मला. मनात नोंद करतो तो, नोटेड इट्स कन्टेन्ट्स पण घरात असे तुफान (भांडण) बघतो आणि मनात गाठ बांधतो की मोठा झाल्यावर

मी पप्पांना मारणार! असे आपल्यासाठी आतापासून ठरवून ठेवतो. मग मोठा झाल्यावर मारतो. तर काय मारण्यासाठी मी तुला मोठे केले? तर तुम्हाला कोणी मोठे केले? असे बोलेल तो. अरे, माझ्या बापापर्यंत पोहचलास? तेव्हा बोलेल तुमच्या आजोबापर्यंत पोहचेल. तुम्ही बोलण्याचा स्कोप (संधी) दिला त्यामुळेच न?! अशी गाठ बांधायला दिली तर ती आपलीच चुक म्हणावी लागेल न! घरात भांडण कशाला? जर तिला ओरडलात नाही तर मुले पण बघतील की पप्पा किती चांगले आहेत!

मुलांनो, तुम्ही लग्नासाठी का नाही म्हणता? मी त्यांना विचारले काय हरकत आहे तुम्हाला, ते मला सांगा न? तुम्हाला स्त्री आवडतच नाही की काय? वास्तविकता काय आहे ते मला सांगा. तेव्हा बोलतात, नाही आम्हाला लग्न नाही करायचे. मी विचारले का? तेव्हा म्हणाले, लग्नात सुख नाहीच हे आम्ही पाहिले आहे. मी सांगितले, अजून तुमचे वय नाही झाले, आणि लग्न केल्याशिवाय कसे माहित झाले, कसा अनुभव आला? तेव्हा म्हणतात, आमच्या आई-वडिलांचे सुख (!) आम्ही पहात आलो आहोत. आम्ही जाणतो ह्या लोकांचे सुख ही लोकच जर सुखी नाहीत, तर आम्ही लग्न केले तर जास्त दु:खी होणार. म्हणजे असे पण होते.

असे आहे न, आता जर का मी बोलतो की हे पहा भाऊ, आता बाहेर अंधार झाला आहे. तेव्हा तो भाऊ म्हणेल नाही उजेड आहे. तेव्हा मी म्हणार की भाऊ, मी तुम्हाला रिक्वेस्ट (विनंती) करतो, तुम्ही पुन्हा पहा न! तेव्हा बोलतो नाही उजेड आहे. तेव्हा मी समजतो की त्यांना जसे दिसले तसे ते बोलणार. माणूस स्वत:च्या दृष्टी पलिकडे पाहू शकत नाही . तेव्हा मी त्यांना सांगतो की तुमच्या व्यू पोइन्टने तुम्ही खरेच आहात. आता माझ्यासाठी दुसरे काही काम असेल तर बोला. एवढेच बोलतो, 'यस, यू आर करेक्ट बाय योर व्यू पोइन्ट'! (हो, तुम्ही तुमच्या दृष्टीकोनाने खरे आहत.) बोलून, मी पुढे वळतो. ह्यांच्याबरोबर रात्रभर का म्हणून मी बसून रहायचे? हे तर असे नी असेच राहणार. अशाप्रकारे मतभेदावर समाधान मिळवायचे आहे.

समजा की इथून पाचशे फुट अंतरावर आपण एक सुंदर सफेद घोडा उभा केला आहे आणि इथे असलेल्या प्रत्येकाला विचारले की तुम्हाला तिथे

काय दिसते ? तेव्हा कोणी बोलेल गाय, तेव्हा आपल्याला त्याचे काय केले पाहिजे ? आपल्या घोड्याला कोणी गाय म्हटले, तर आपण त्याला मारले पाहिजे की काय केले पाहिजे ?

**प्रश्नकर्ता :** मारायचे नाही.

**दादाश्री :** का ?

**प्रश्नकर्ता :** त्याच्या दृष्टीने त्याला ती गाय दिसली.

**दादाश्री :** हो. त्याचा चष्मा असा आहे. आपण समजून जावे की त्या बिचाऱ्याला नंबर आले आहे त्यामुळे त्याचा दोष नाही. म्हणून आपण रागवायचे नाही. त्याला सांगावे की भाऊ तुम्ही म्हणता ते बरोबर आहे. मग दुसऱ्याला विचारावे तुला काय दिसते ? तेव्हा तो बोलेल घोडा दिसतो आहे. तेव्हा आपण समजून जावे की ह्यांना नंबर नाही. मग तिसऱ्याला विचारावे तुला काय दिसत आहे ? तर तो म्हणेल, मोठा बैल दिसतो आहे. तर मग आपण त्याच्या चष्म्याचा नंबर समजून जाल. नाही दिसत अर्थात् नंबर आहे. असे आपण समजावे. तुम्हाला काय वाटते ? आंतरिक मतभेद जे असतात ते वर्तनात सुद्धा दिसून येतात तर ते फार भयंकर म्हटले जाईल ना ?

**दादाश्री :** आंतरिक मतभेद न ? ते तर फार भंयकर! पण मी शोधखोळ केली की ह्या आंतरिक मतभेदाचे काही उपाय आहे का ? परंतु उपाय कुठल्याही शास्त्रात मिळाले नाही. म्हणून मग मी स्वत:च शोधखोळ केली की ह्याचा उपाय हाच की जर मी माझे मतच काढून टाकले तर मतभेद राहणारच नाही. माझे मतच नाही, तुमचे मत हेच माझे मत.

एकदा माझे हीराबाबरोबर मतभेद झाले. मी पण फसलो गेलो. माझ्या वाइफला मी हीराबा बोलतो. आम्ही तर ज्ञानीपुरुष, आम्ही तर सगळ्यांना 'बा' बोलतो आणि बाकी सर्वांना मुली बोलतो. जर तुम्हाला ऐकायचे असेल तर बोलतो, ही काही लांब गोष्ट नाही, छोटीशी गोष्ट आहे.

**प्रश्नकर्ता :** हो, ती गोष्ट सांगा ना!

**दादाश्री :** एकदा मतभेद झाले होते. त्यात माझीच चुक होती. त्यांची चुक नव्हती.

**प्रश्नकर्ता :** ती तर त्यांचीच चुक झाली असेल, पण तुम्ही बोलत आहात की माझी चुक झाली होती.

**दादाश्री :** हो, पण त्यांची चुक नव्हती. माझीच चुक. मलाच मतभेद होऊ द्यायचे नाही. त्यांना तर मतभेद झाले तरी काही हरकत नाही आणि नाही झाले तरी काही हरकत नाही. मलाच होऊ द्यायचे नाही, म्हणून माझीच चुक झाली ना! हे असे केले तर खुर्चीला लागेल की मला?

**प्रश्नकर्ता :** आपल्याला.

**दादाश्री :** तर मग मलाच समजले पाहिजे ना?

एके दिवशी मतभेद झाले. मी फसलो. मला हीराबा म्हणाल्या माझ्या भावाच्या चार मुलींचे लग्न व्हायचे आहे. त्यात ह्या पहिल्या मुलीचे लग्न आहे, तर आपण लग्नात काय (आहेर) देणार. तसे तर त्यांनी असे नाही विचारले असते तरी चालले असते. जे काही देणार त्याला मी नाही म्हणणार नण्हतो. मला विचारले म्हणून मी माझ्या अक्कलेप्रमाणे चाललो. त्यांच्या सारखी अक्कल माझ्यात कुठून असणार? त्यांनी विचारले म्हणून मी सांगितले की, नवीन काही बनवण्यापेक्षा ह्या कपाटात चांदीचे जे काही आहे त्यातले काहीतरी द्या ना!

ह्यावर त्यांनी मला काय सांगितले माहिती आहे का? आमच्या घरी माझे-तुझे सारखे शब्द निघत नव्हते. आपण, आपलेच असेच बोलले जात होते. आता त्या अश्या बोलल्या की, 'तुमच्या मामाच्या मुलाच्या मुलीचे लग्न होते, तेव्हा तर मोठे-मोठे चांदीचे ताट देता ना?' त्यादिवशी माझे-तुमचे बोलल्या, नेहमी आपलेच म्हणत असत. माझे-तुमचे असा भेद करुन बोलत नव्हत्या. मी विचार केला, आज आपण फसलो, मी लगेचच समजून गेलो. म्हणून ह्यातून बाहेर निघण्याचा रस्ता शोधू लागलो. आता कश्याप्रकारे हे सुधारायचे, रक्त निघू लागले, आता कश्याप्रकारे पट्टी बांधावी की, रक्त बंद होईल, ते आम्हाला माहित होते.

अर्थात् त्या दिवशी माझे-तुझे झाले. 'तुमच्या मामाचा मुलगा' म्हटले! इथपर्यंत पहोचले. माझी समज किती उल्टी! मी विचार केला हे तर ठोकर लागण्यासारखे झाले, आज तर! तेव्हा मी लगेचच पलटलो. पलटण्यात

काहीच हरकत नाही, मतभेद करण्यापेक्षा पलटणे चांगले. लगेचच पलटून गेलो पूर्ण...... मी सांगितले, 'मी असे नाही सांगू इच्छित' मी खोटे बोललो, मी सांगितले 'मी वेगळे बोलतो आहे आपल्या समजण्यात जरा फरक झाला आहे. मी असे नाही सांगत होतो.' तेव्हा म्हणाल्या, तर काय सांगत होतात ? तेव्हा मी म्हणालो, 'हे चांदीचे छोटे भांडे द्या आणि त्यासोबत पाचशे रुपये नगद द्या.' ते त्यांच्या उपयोगी येतील. त्यावर हीराबा महणाल्या 'तुम्ही तर भोळे आहात. इतके सारे देतो कोणी?' ह्यावर मी समजलो की, जिंकलो आपण! मग मी सांगितले 'तुम्हाला जितके द्यायचे असेल तितके द्या. चारीही भाच्या आपल्याच मुली आहेत!' तेव्हा त्या खुश झाल्या मग 'तुम्ही तर देवासारखे आहात' असे बोलू लागल्या!

बघा, पट्टी बांधली ना! मला माहित होते की, मी पाचशे बोललो तर त्या तेवढे देतील अश्या नाहीत त्या! तर आपण त्यांनाच अधिकार देऊन टाका न! मी स्वभाव ओळखत होतो. मी पाचशे दिले तर त्या तीनशे देऊन येतील. तर मग बोला, सत्ता सोपवायला हरकत आहे का मला?

## ४. जेवताना किट-किट

घरात कटकट कश्यासाठी करता? का? माणसांकडून चुक नाही होऊ शकत?

जो करतो त्याची चुक की जो करत नाही त्याची चुक?

**प्रश्नकर्ता :** करतो त्याची.

**दादाश्री :** तर मग 'कढी खारट' आहे अशी चुक काढायला नको. त्या कढीला बाजूला सारून, बाकी जे काही आहे ते जेवून घेतले पाहिजे. कारण त्यांना सवय आहे की अशी काही चुक काढून पत्नीला धमकावायचे. ही सवय आहे त्यांची. पण ह्या ताई पण काही कच्च्या नाहीत. अमेरिका असे करतो तर, रशिया तसे करतो. अर्थात् हे तर अमेरिका आणि रशियासारखे झाले आहे, कुटुंबात, फॅमिलित, म्हणजे मग आतमध्ये कॉल्डवॉर (शीतयुद्ध) निरंतर चालतच रहातो. असे नाही, फॅमिलि बनवून टाका. फॅमिलित कसे वागावे ते मी तुम्हाला समजावेल. इथे तर घरोघरी क्लेश आहे.

'कढी खारट झाली' असे आपण नाही बोललो तर नाही का चालणार ? ओपिनियन नाही दिले तर काय त्या लोकांना नाही माहित पडणार ? की मग आपल्यालाच बोलायला हवे. मग तर आपल्याकडे पाहुणे आलेले असतील, तर त्या पाहुण्यांना पण खाऊ देणार नाही. तर मग आपण असे का बोलावे ? ती खाणार तेव्हा तिला कळणार नाही का ? की आपल्यालाच तिला सांगावे लागेल ?

**प्रश्नकर्ता :** कढी खारट असली तर 'खारट' बोलावेच लागेल ना ?

**दादाश्री :** मग जीवन खारटच होऊन जाईल ना ! तुम्ही खारट बोलून समोरच्याचा अपमान करता. त्याला फॅमिलि बोलत नाही !

**प्रश्नकर्ता :** आपले असतील त्यांनाच सांगतो ना, परक्यांना थोडीच सांगू शकतो ?

**दादाश्री :** तर आपल्यानांच काय दुखवायचे ?

**प्रश्नकर्ता :** सांगितले तर दुसऱ्यावेळेस नीट बनवतील ना, त्यासाठी.

**दादाश्री :** ती नीट बनवणार की नाही बनवणार, ह्या सर्व गोष्टी गप्पा आहेत. कशाच्या आधारावर होत असते ? ते मला माहित आहे. बनवणाऱ्यांच्या हातातही सत्ता नाही आणि तुम्ही सांगणाऱ्यांच्या हातातही सत्ता नाही. हे सर्व कोणत्या सत्तेच्या आधारावर चालत आहे ? म्हणून अक्षरही बोलण्यासारखे नाही.

थोडा तरी शहाणा झालास की नाही तु ? होशील ना शहाणा ? पूर्णपणे शहाणे व्हायचे. घरी वाइफ बोलेल. 'अरे, असा नवरा पुन्हा पुन्हा मिळो.' मला आजपर्यंत एकाच स्त्रीने सांगितले. 'दादाजी, नवरा हवा तर असाच हवा.' नाहीतर जास्तकरुन तोंडावर चांगले बोलतात, परंतु पाठून किती तरी शिव्या देतात माझ्या मनात आजही नोंद आहे. असे बोलणारी एक तरी बाई मिळाली !

बाकी स्त्रियांना सारखे टोकले नाही पाहिजे. भाजी थंड का झाली ? डाळीला फोडणी बरोबर का नाही दिली ? अशी कट कट का करता ? बारा महिन्यात एखाद्या दिवशी एखादा शब्द बोललात तर ठिक आहे. परंतु हे तर रोजचेच ? 'नवरा मर्यादेत तर बायको लाजेत.'

आपल्याला मर्यादेत रहायला हवे डाळ चांगली झाली नसेल, भाजी थंड झाली असेल ते सर्व तर नियमांच्या आधीन होत आहे. त्यातून वाटल्यास हळूच बातचीत करावी की 'ही भाजी तर रोज गरम असते, तेव्हा खूप छान वाटते.' अशाप्रकारे बोललात तर ती लगेचच इशारा समजून जाईल.

आमच्याकडे तर घरातही कोणाला माहित नाही की 'दादांना' हे आवडते की नाही आवडत. स्वयंपाक बनवणे हे काही बनवणाऱ्याच्या हाताचा खेळ आहे का? ते तर खाणाऱ्यांचा ताटात *'व्यवस्थित शक्तिच्या' हिशोबाने येत असते, त्यात तक्रार नाही केली पाहिजे.

## ५. मालक पाहिजे, मालकीपणा नको

लग्नकरण्यापूर्वी मुलगी पाहता, त्यात काही हरकत नाही, पहा पण ती पूर्ण आयुष्यभर जशीच्या-तशीच राहणार असेल तर पहा. तशीच राहणार आहे का? जशी पाहिली होती तशीच? परिवर्तन झाल्याशिवाय राहिल ? नंतर जेव्हा परिवर्तन होईल, तेव्हा सहन नाही होणार, व्याकुळता होऊ लागेल. मग जाणार कुठे? फसलो रे बाबा, फसलो.

तर मग लग्न कश्यासाठी? तर आपण बाहेरून कमावून आणायचे, ती घरकाम करेल आणि आपला संसार चालेल, आणि धर्म ही चालेल, ह्यासाठी लग्न करायचे आहे. आणि बायको बोलत असेल की एक-दोन अपत्य तर पाहिजे, तर मग तेवढे निराकरण करा, मग राम तुझी माया! परंतु तो तर मग मालक बनायला जातो. अरे मुर्खा, मालक बनायला का चालला आहेस? तुझ्यात बरकत नाही तरी मालक बनायला चालला आहेस! 'मी तर मालक आहे' असे बोलतो! मोठा आला मालक! तोंड तर पहा ह्या मालकाचे! परंतु लोकं तर मालकी हक्क गाजवतात ना?

गायीचा मालक बनून बसला आहे, म्हशीचा पण, परंतु गाय पण तुम्हाला मालकाच्या रुपात स्विकारत नाही. हे तर तुम्ही मनात समजता की ही गाय माझी आहे. तुम्ही कापसाला पण माझे बोलता, 'हा कापूस माझा आहे.' कापसाला तर माहितही नाही बिचाऱ्याला. कापूस तुमचे असते तर तुमच्या हजेरीतच वाढले असते, तुम्ही घरी गेल्यावर वाढले नसते. परंतु हा कापूस तर रात्री पण वाढतो. कापूस रात्री वाढतो की नाही वाढत?

**प्रश्नकर्ता :** वाढतो, वाढतो.

**दादाश्री :** कापसाला तुमची गरज नाही, त्याला तर पावसाची गरज आहे. जेव्हा पाऊस पडत नाही, तेव्हा सुकून जातो बिचारा!

**प्रश्नकर्ता :** पण, त्यांनी आमची पूर्ण काळजी घ्यायला नको?

**दादाश्री :** ओहोहो! बायको काळजी ठेवण्यासाठी आणली आहे का?

**प्रश्नकर्ता :** ह्यासाठीच तर बायकोला घरी आणले आहे ना?

**दादाश्री :** असे आहे की, शास्त्रज्ञांनी सांगितले आहे की मालिकत्व (स्वामित्व) दाखवायचे नाही. वास्तवात तुम्ही मालक नाही, तुमची पार्टनरशिप (भागीदारी) आहे. हे तर व्यवहारात बोलले जाते की वर आणि वधू, मालक आणि मालकीण! पण खरोखर पार्टनरशिप आहे. मालक आहात, म्हणून तुमचा हक्क-दावा नाही, दावा करु शकत नाही. समजावून-उमजावून सर्व काम करा.

**प्रश्नकर्ता :** कन्यादान केले, दानात कन्या दिली, तर मग आम्ही त्यांचे मालक झालो ना?

**दादाश्री :** हे सुसंस्कृत समाजाचे काम नाही, हे वाईल्ड समाजाचे काम आहे. आपल्या, सुसंस्कृत समाजाने, हे पहायला हवे की पत्नीला जराही अडचण होऊ नये. पत्नीला दु:ख देऊन कोणी सुखी झाला नाही. आणि ज्या स्त्रिने पतीला जरापण दु:ख दिले असेल, ती स्त्री पण कधी सुखी झाली नाही!

मालकीपणामुळे तर तो डोक्यावर चढून बसतो. मालकीपणा हे, भोगणं आहे. वाइफसोबत त्याची पार्टनरशिप आहे, मालकी नाही.

**प्रश्नकर्ता :** जर वाइफ बॉस बनून बसली तर तिचे काय करावे ?

**दादाश्री :** काही हरकत नाही, पत्नी तर जिलेबी, भजी बनवून देते ना. आपण तिला सांगावे वाह! वाह! माझ्यासाठी भजी, जिलेबी बनवली ! असे कराल तर खुश होऊन जाईल, मग दुसऱ्या दिवशी आपोआप शांत

होऊन जाईल. त्याची भीती नका ठेऊ. ती आपल्या डोक्यावर केव्हा चढेल? जर तिची मिशी उगवेल तर ती चढून बसेल. पण मिशी उगवणार आहे का? कितीही हुशार झाली, तरी मिशी उगवणार?

बाकी, एक जन्म तर तुमचा जितका हिशोब असेल तितकाच फेडावा लागेल. इतर काही लांबलचक हिशोब होणारच नाही. एका जन्माचा हिशोब तर निश्चितच आहे, तर मग आपल्याला शांतता ठेवायला काय हरकत आहे?

हिंदू तर मुळातच क्लेशी स्वभावचे. म्हणून तर असे म्हणतात की हिंदू क्लेशमय जीवन जगतात. मुसलमान लोक तर असे पक्के असतात की बाहेर भांडण करुन येतात. परंतु घरात बायकोसोबत भांडण करत नाहीत. तसे आता तर मुस्लिम लोकही हिंदुंसोबत राहिल्यामुळे बिघडले आहेत. पण तरीही ह्या बाबतीत हिंदुपेक्षा मुस्लिम लोक मला-शहाणे वाटतात. अरे काहीजण तर आपल्या बीबीला (पत्नीला) हेलकावे सुद्धा देत असतात.

**प्रश्नकर्ता :** ते हेलकावे देत होते, मिंयाभाई! ती गोष्ट सांगा ना!

**दादाश्री :** हा, एके दिवशी आम्ही एका मिंयाभाईकडे गेलो होतो. ते मिंयाभाई बायकोला झोपाळ्यावर झुलवत होते. त्यावर मी त्यांना विचारले की, आपण असे करता त्यामुळे ती आपल्या डोक्यावर चढून नाही बसत ? तेव्हा ते म्हणाले, ती काय चढून बसणार, तिच्याजवळ तर काही शस्त्रही नाही. आम्हा हिंदूना तर भीती वाटते की ती चढून बसली तर काय होईल ? त्यामुळे आम्ही झोके देत नाही. तेव्हा मिंयाभाई बोलले की 'हे झोके देण्याचे कारण तुम्हाला माहित आहे का?

तर ते असे झाले की, १९४३-१९४४ मध्ये आम्ही गवर्मेन्ट कामाचे कॉन्ट्रेक्ट घेतले होते, त्यात एक गवंडी कामाचे लेबर कॉन्ट्रेक्ट होते. त्याने आमच्या हाताखाली कॉन्ट्रेक्ट घेतले होते. त्याचे नांव होते अहमदमिंया, हे अहमदमिंया कित्येक दिवसापासून बोलत होते की, 'साहेब माझ्या घरी तुम्ही या, माझ्या झोपडीत या,' झोपडी बोलत होता बिचारा. बोलण्यात चांगले समजूतदार होते, वर्तनात असतील किंवा नसतीलही, ती गोष्ट वेगळी पण बोलण्यात जिथे स्वार्थ नाही, तिथे चांगले वाटते.

तर ते अहमदमिंया एके दिवशी मला बोलू लागले, 'सेठजी, आज आमच्या घरी पाहुलं करावे. तुम्ही माझ्या घरी आलात तर माझ्या बायको-मुलांना आनंद होईल.' तेव्हा आम्हाला ज्ञान-बिन तर नव्हते पण विचार खूप सुंदर. सगळ्यांसाठी भावना होती खूप सुंदर. आपल्याकडून तो कमवत आहे तर आणखीन जास्त कसे कमवेल, अशी पण भावना होती. आणि तो दु:खातून मुक्त होऊन सुखी व्हावा अशी भावना!

मी म्हणालो,'का नाही येणार? तुझ्याकडे तर हमकास येणार.' तेव्हा मिंयाभाई बोलू लागले, 'माझ्या घरी तर एकच रूम आहे, आपल्याला कुठे बसवू?' तेव्हा मी सांगितले,'मी कुठेही बसेन, मला तर फक्त एक खुर्ची पाहिजे. जरी खुर्ची नसली तरी मला चालेल. तुझी इच्छा आहे, म्हणून मी नक्की येणार.' मग मी तर गेलो. आमचा कॉन्ट्रेक्टचा व्यवसाय असल्यामुळे आम्हाला मुसलमानांच्या घरी सुद्धा जावे लागत, तिथे चहा सुद्धा घेतो! आमच्यासाठी कोणी परके नाही.

मी बोललो, 'अरे, ही एकच मोठी रूम आहे आणि दुसरी तर संडासाइतकी छोटी आहे.' तेव्हा म्हणे,'साहेब क्या करे? हमारे गरीब के लिए इतना बहुत है.' मी विचारले, 'तुझी वाइफ कुठे झोपते?' तेव्हा म्हणाला,'ह्याच रूम मध्ये, ह्याला बेडरूम म्हणा, डाइनिंग रूम म्हणा, सर्व काही हेच आहे.' मी विचारले, 'अहमदमिंया औरत के साथ कुछ झगडा-बिगडा होता नही क्या?' 'हे काय बोलला?' मी विचारले, 'का?' तेव्हा तो म्हणाला, 'कधीच नाही होत. मी असा मूर्ख माणूस नाही.' परंतु मतभेद ?! तेव्हा म्हणाला, काय बोलत आहात? नाही, बायको सोबत मतभेद नाही. बायकोसोबत माझे भांडण नाही होत. मी विचारले 'कधी बायको रागावली तर' तेव्हा बोलू लागला, 'प्रिये, एक तर बाहेर साहेब हैराण करतो आणि तू सुद्धा हैराण करू लागलीस तर माझे काय होईल?' तेव्हा मग चूप होऊन जाते! मी विचारले, 'मतभेद होत नाहीत म्हणून मग काही भानगडच नाही ना?' तेव्हा बोलला, 'नाही, मतभेद झाले तर ती कुठे झोपेल आणि मी कुठे झोपणार? इथे दोन-तीन मजले असतील तर मी समजेल की तिसऱ्या मजल्यावर निघून जावे. परंतु इथे तर ह्याच रूम मध्ये झोपायचे आहे. मी ह्या बाजूला तोंड करुन झोपावे आणि तिने त्या बाजूला तोंड करुन

झोपावे, ह्यात काय मजा येणार? रात्रभर झोप येणार नाही. पण आता तर मी कुठे जाऊ शेठजी?! म्हणून ह्या बायकोला मी कधीही दु:ख नाही देत. बीबीने मला मारले तरीपण तिला दु:ख नाही देत. मी बाहेर सर्वांन बरोबर भांडण करुन येईल, पण 'बायकोबरोबर मी क्लियर राहतो. बायकोला काहीही नाही केले पाहिजे.' म्हणजे त्याला जर खाज येत असेल, तर तो बाहेर भांडण करुन येणार पण घरात नाही.'

बायकोने सुलेमानला मिठाई आणायला सांगितले असेल, आणि सुलेमानला पगार कमी मिळत असे, तर तो बिचारा मिठाई कुठून आणणार? बायको एक महिन्यापासून सुलेमानला सांगत असते की ह्या सर्व मुलांना, बिचाऱ्यांना खूप ईच्छा आहे. आता तरी मिठाई घेऊन या. मग एके दिवशी बायको खूप चिडली तेव्हा तो बोलला, 'आज तर घेऊन येतो,' मिंयाभाई जवळ उत्तर रोकड आहे, त्याला माहित आहे की, उत्तर उधार ठेवले तर शिव्या देईल. म्हणून सांगतो की आज घेऊन येतो. असे बोलून सुटका करतो. जर उत्तर नाही दिले तर जाते वेळी बायको कटकट करेल. म्हणून लगेचच पोजिटिव उत्तर (होकार) देतो की आज घेऊन येतो, कुठूनही घेऊन येतो. तेव्हा बायकोला वाटते की आज घेऊनच येणार, परंतु जेव्हा तो येतो तेव्हा खाली हात बघून बायको ओरडते. सुलेमान तसा चतुर असल्यामुळे बायकोला समजावतो की, 'यार मेरी हालत मै ही जानता हूं, तुम क्या समझो!' असे एक-दोन वाक्य बोलतो की बायको म्हणते,'ठीक आहे नंतर कधीतरी आणा.' परत दहा-पंधरा दिवसांनी बायको तक्रार करते तर, 'माझी हालत मलाच माहित.' असे बोलतो आणि बायको खुश होऊन जाते. तो कधीही भांडत नाही.

आणि आपली लोक तर त्यावेळेला म्हणतील की, 'तू माझ्यावर दबाव आणतेस?' अरे, स्त्रीला असे बोलू नको. त्याचा अर्थ असा, तु स्वत:च बोलतोस की, 'तू दबलेला आहेस.' लग्न करतेवेळी सुद्धा तुझाच हात वर असतो, मग ती तुला कशी दबवणार? त्यातून आज तिने दबवले तर आपण शांत रहावे, जो निर्बल आहे तोच चिडणार.

औरंगाबाद मध्ये एक हकीमचा मुलगा आला होता. त्याने ऐकले असेल की दादांकडे काही अध्यात्म ज्ञान समजण्यासारखे आहे. त्यासाठी

तो मुलगा आला, पंचवीस वर्षांचा होता तो. तेव्हा मी सत्संगच्या, या दुनियाच्या सर्व गोष्टी केल्या. कारण की ही वैज्ञानिक पद्धत चांगली आहे, आपल्याला ऐकण्यासारखी आहे. आतापर्यंत जे चालत होते ते काळानुसार लिहिले गेले आहे. जसा काळ होता तसे वर्णन केलेले आहे. अर्थात् जग जस-जसे बदलत जाते, तसे वर्णन बदलत जाते. आणि पैगंबर साहेब म्हणजे काय? खुदाचे पैगाम इथे आणून सर्वांना पोहचवतो त्याचे नांव पैगंबर साहेब. मी तर थट्टा केली त्याची, मी विचारले की, 'अरे, लग्न-बिग्न केले की नाही, की असाच फिरतो आहेस?' तो म्हणाला 'लग्न केले आहे.' मी विचारले, 'केव्हा केले? मला बोलावले नाहीस तू?' तर तो म्हणाला 'दादाजी माझी आपल्याबरोबर ओळख नव्हती, त्यावेळी नाहीतर बोलावले असते, आता लग्न होऊन सहा महिनेच झाले आहेत.' मी थोडी गम्मत केली, मी विचारले 'नमाज किती वेळा पढतोस?' म्हणे 'साहेब, पाचही वेळा,' अरे, रात्री तीन वाजता नमाज कशी जमते? तेव्हा तो म्हणाला, 'करावीच लागते, त्यात चालतच नाही, रात्री तीन वाजता उठून अदा करतो. लहानपणापासूनच करत आलो आहे. माझे वडिल हकीम साहेब पण करत होते.' मग मी विचारले, 'आता तर बायको आली, आता कशी करु देणार, तीन वाजता?' 'बीबीने पण मला सांगितले आहे की, तुम्ही नमाज पढून घ्यावी.' तेव्हा मी विचारले, 'बायकोबरोबर भांडण होत नाही का?' 'हे काय बोलतात? हे काय बोलतात?' मी विचारले 'का?' तेव्हा तो म्हणाला 'ओहोहो, बायको तर तोंडाचे पान! ती मला ओरडली तरी मी चालवून घेईल, साहेब. बीबीमुळेच तर मी जगतो आहे, बीबी मला खूप सुख देते. खूप छान छान जेवण बनवून देते. तिला दुःख कसे द्यायचे?' आता इतके समजलात तरी खूप झाले. बायकोवर रुबाब तर करणार नाही. आपल्याला समजायला नको? बायकोचा काही अपराध आहे का? ती तर 'तोंडातले पान' तिने शिवी दिली तरी काही हरकत नाही. कोणी दुसऱ्याने शिवी दिली तर मी बघून घेईल. बघा आता! ह्या लोकांना बायकोची किती किंमत आहे.

## ६. समोरच्यांची चुक काढण्याची सवय!

**प्रश्नकर्ता :** चुक काढली तर वाईट वाटते त्यांना आणि नाही काढली तरीपण वाईट वाटते.

**दादाश्री :** नाही, नाही, वाईट नाही वाटत. आपण चुक नाही दाखवली तर, ती बोलेल, 'कढी खारट होती, तरीही नाही सांगितले.' तेव्हा तुम्ही सांगा, 'तुला माहित पडेल ना, मी कशाला सांगू.' परंतु हे तर कढी खारट झाली तर तोंड वाकडे करतात, 'कढी खारट आहे!' अरे! कसा माणूस आहेस? ह्याला पती म्हणून कसे ठेवावे? अश्या पतीला बाहेर काढून टाकले पाहिजे. असा दुर्बळ पती! अरे पत्नीला समजत नाही का की तुम्ही तिला समजवयाला निघाला आहात? तिच्याबरोबर डोकेफोडी करता! मग तिच्या हृदयावर घाव पडणार ना! मनात बोलेल, 'हे काय मला समजत नाही ? हे तर माझ्यावर तीर सोडत आहेत. हा काळमुखा तर दररोज माझ्या चूकाच काढत राहतो.' आपली लोकं जाणून-बुझून चूका काढत असतात. आणि त्यामुळे संसार जास्तच बिघडत जातो. काय वाटते आपल्याला? तर मग आपण थोडा विचार केला तर काय हरकत आहे ?

**प्रश्नकर्ता :** आपण चूका दाखवल्या तर पुन्हा त्याच चूका होणार नाहीत ना?

**दादाश्री :** ओहोहो, अर्थात् शिकवण देण्यासाठी! हो, तर मग चुक काढण्यास हरकत नाही, मी तुम्हाला सांगतो की चूका काढा, पण ती त्यासाठी तुमचे उपकार मानत असेल तर चूका काढा. ती बोलेल बरे झाले तुम्ही माझी चुक दाखवलीत. मला तर माहितच नव्हते. असे तुम्ही उपकार मानता? ताई, तुम्ही ह्यांचे उपकार मानता का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** तर मग ह्याचा अर्थच काय? ज्या चूका तिला माहित आहेत, त्या सांगण्यात काही अर्थ आहे का? त्यांना स्त्रिया काळमुखा बोलतात, की जेव्हा बघावे तेव्हा बोलत राहतो. ज्या चूका तिला माहित आहेत, त्या चूका आपण दाखवू नये. इतर काहीही हो, कढी खारट झाली असो, किंवा भाजी बिघडली असो, पण जेव्हा ती खाणार तेव्हा तिला कळणार की नाही? तर मग आपल्याला सांगण्याची गरज नाही! पण जी चुक तिला माहित नसेल, ती आपण तिला सांगितली तर ती उपकार मानेल.

बाकी, ज्या तिला माहित आहेत, त्या चूका दाखवणे हा तर अपराध आहे. आपली इंडियन लोकंच चूका काढतात.

मी सांताक्रुजला तिसऱ्या मजल्यावर घरात बसलो असेल तेव्हा चहा येतो. तर एखाद्या दिवशी जरा साखर घालायला विसरले असतील, तरी पिऊन टाकतो आणि तेही दादांच्या नावांने! आतमध्ये दादांना सांगतो की चहात साखर घाला साहेब! तेव्हा दादा घालतात. अर्थात् बिनसाखरेचा चहा येतो तेव्हा पिऊन टाकतो बस. आमची काही तक्रार नसते ना! आणि मग ते साखर घेऊन धावत येतात. मी विचारले, भाऊ साखर कशाला आणलीस? ही चहाची कप-बशी घेऊन जा! तेव्हा बोलतात, चहा फिकी होती तरीही आपण साखर नाही मांगितली! मी म्हणालो 'मी कशाला सांगू? तुमच्या लक्षात येईल अशी गोष्ट आहे ही.'

एका माणसाला मी विचारले, घरात कधी बायकोच्या चूका काढतोस का? तेव्हा बोलला, 'ती तर आहेच चूका करणारी, त्यामुळे चूका काढाव्याच लागतात ना! बघा, हे अक्कलेचे बारदान! विकायला गेलो तर चार आने पण नाही मिळणार ह्या बारदानाचे, तरी समजतो की, माझी बायको चूका करणारी आहे, घ्या!

**प्रश्नकर्ता :** काहींना आपल्या चूका माहित असतात, तरीही सुधारत नाही मग?

**दादाश्री :** ते बोलून नाही सुधारणार. बोलण्याने तर जास्त उल्टे चालतात. तो जर कधी त्यावर विचार करत असेल तर त्यावेळी तुम्ही त्याला सांगावे की, ही चुक कशी सुधारायची! समोरासमोर बातचीत करा, फ्रेन्ड (मित्रा)सारखे. वाइफ बरोबर फ्रेन्डशिप ठेवली पाहिजे, नाही ठेवली पाहिजे ? मित्रांबरोबर अशी कटकट करतात का? त्याची चुक डायरेक्ट सांगता का? नाही ना! कारण फ्रेन्डशिप टिकवायची आहे. आणि ही तर लग्नाची, कुठे जाणार आहे? असे आपणास शोभत नाही. जीवन बागेसारखे बनवा. घरात मतभेद व्हायला नकोत, कधीही नाही, घर बागेसारखे वाटावे. घरात ढवळाढवळ करु नका. छोट्या मुलालाही, जर त्याची चुक त्याला दिसत असेल तर दाखवायची नाही. दिसत नसेल तर चुक दाखवू शकता.

हा तर व्यर्थ वेडेपणा होता, मालकत्व सिद्ध करण्याचा. अर्थात् मालकत्व नाही दाखवले पाहिजे. मालक तर केव्हा म्हटले जाईल की, जेव्हा समोरचा प्रतिकार करत नसेल तर, तेव्हा समजा की मालक आहे. हे तर लेगेचच प्रतिकार करतात.

घरात तर स्त्री वर सर्वच किटकिट करतात, ही वीर पुरुषांची निशाणी नाही. वीर तर कोणाला म्हणतात की, जो घरात स्त्री अथवा मुलांना, कोणालाही त्रास देत नाही. मुलगा जरी उलटे बोलला, तरी पण आई-वडील मुलावर बिघडणार नाही, तेव्हा खरे बोलावे. मुलं तर शेवटी मुलंच आहेत तुम्हाला काय वाटते? न्याय काय सांगतो.

कोणत्या गोष्टीसाठी टोकावे लागते की, ज्याची तिला समज नसेल. त्यासाठी आपण तिला समजावले पाहिजे. तिला स्वत:ची समज आहे. तरीपण आपण तिला सांगितले, तेव्हा मग तिचा इगोइझम दुखावला जाईल. आणि मग ती सुद्धा संधी शोधते की, माझ्या तावडीत येऊ दे एक दिवस. संधीच्या शोधात राहते. तर मग असे करण्याची काय गरज आहे? अर्थात् ज्या-ज्या गोष्टी ती समजू शकेल अशा असतील त्यात तिला टोकण्याची गरज नाही आपल्याला.

जास्त कडू असेल तर आपण एकट्यानेच पिऊन घ्या, पण स्त्रियांना कसे प्यायला द्याल? कारण आफ्टर ऑल (शेवटी) आपण महादेवजी आहोत. आपण महादेवजी नाही आहोत? पुरुष महादेवजी समान असतात. अधिक कडू असेल तर तिला सांगा. तू झोपून जा, मी पिऊन घेईल! स्त्रिया सुद्धा संसारात सहकार्य नाही का देत? मग त्यांना का दु:खवायचे? तिला जर काही दु:ख झाले असेल, तर आपण मनातल्या मनात पश्चाताप केले पाहिजे की आता दु:ख नाही देणार, माझी चुक झाली ही.

घरात कुठल्या प्रकारचे दु:ख असते? कश्यावरुन भांडण होत असतात? कुठल्या प्रकारचे मतभेद असतात? हे जर दोघांनी लिहून आणले ना, तर एका तासातच सर्वांचे निसरन करुन देऊ. हे सर्व समज नसल्यामुळेच होत असते, बाकी काही कारण नाही.

आपल्या घरातली गोष्ट घरातच राहिल अशाप्रकारे फॅमिलीसारखे

जीवन जगायला हवे. इतके फेरफार केले तरी चांगले आहे. क्लेश तर झालाच नाही पाहिजे. तुम्हाला जितके डॉलर मिळतील, त्यात गुजारा करुन घ्या. आणि ताई तुमच्याजवळ जेव्हा पैशांची सोय नसेल, तेव्हा तुम्ही साड्या घ्यायची घाई करु नका. तुम्ही पण विचार केला पाहिजे की, नवऱ्याला संकटात टाकायचे नाही. पैशांची सोय असेल तर खर्च करा.

## ७. 'गाडी' चा गरम मूड

हे तर रात्री कधी नवऱ्याला घरी परतायला उशीर झाला, काही कारणास्तव, हं.... इतक्या उशिरा घरी येतात का? तर काय त्यांना माहित नाही की उशीर झाला आहे. त्यांच्या मनात पण खटकत असते की, खूप उशीर झाला. त्यातून ही वाइफ असे बोलते की इतक्या उशिरा कोणी घरी येते का? बिचारा! अशा मीनिंगलेस (व्यर्थ) गोष्टी केल्या पाहिजे का? तुझ्या लक्षात येते असे? अर्थात् जेव्हा ते घरी उशिरा येतील, त्या वेळी पाहून घ्या की मूड कसा आहे? नंतर लगेच सांगा की आधी तुम्ही चहा-पाणी प्या, नंतर मग जेवायला बसा. असे बोलण्यामुळे चांगल्या मूडमध्ये येणार. मूड बिघडलेला असेल तर आपण त्यांना चहा-पाणी पाजून खुश करा. जसे पुलिसवाला आला असेल, आणि आपला मूड नसेल, तरीपण चहा-पाणी नाही का करत? मग हे तर आपले आहेत, त्यांना खुश करायला नको? आपले आहेत म्हणून खुश करायला नको? बहुतेक तुम्हा सर्वांना माहित असेल की कधी गाडी मूडमध्ये नसते, होते ना असे? गाडी गरम झाली असेल आणि आपण गाडीला काठीने मारत राहिलो तर काय होईल! तिला मूडमध्ये आणण्यासाठी थंड करावी लागते. रेडियेटर फिरवावा, पंखा चालवावा असे करता येते ना?

**प्रश्नकर्ता ( स्त्री ) :** ब्रांडी कशी सोडवायची?

**दादाश्री :** घरात जर तुमचे प्रेम पाहिले तर सर्व काही सोडून देतील. प्रेमासाठी सर्व काही सोडण्यास तयार आहेत. प्रेम दिसत नाही म्हणून ब्रांडीवर प्रेम करतात, इतर कशावर तरी प्रेम करतात. नाही तर बीच (समुद्र किनाऱ्यावर) वर फिरत राहतात. तुझ्या बापाने काही ठेवले आहे का इथे ? घरी जा ना! तेव्हा बोलतो, 'घरी तर मला करमत च नाही.'

# ८. सुधारावे की सुधरावे

हे संबंध रिलेटिव (सापेक्ष) आहेत. काही लोकं काय करतात पत्नीला सुधारण्यासाठी इतके हट्ट करतात की प्रेमाची दोरी तुटून जाईल एवढा हट्टीपणा पकडून ठेवतात. ते समजतात की मला सुधारावीच लागेल हिला. अरे! तू सुधर ना! तू स्वतः सुधर एकदाचा. आणि हे तर रियल नाही, रिलेटिव आहे. वेगळे होऊन जाईल. म्हणून आपल्याला खोटे तर खोटे पण तिची गाडी पटरीवर चढवायची. इथून पटरीवर चढली तर स्टेशन वर पोहचेल, सटासट. अर्थात् हे रिलेटिव आहे. आणि समजावून ऊमजावून निवाडा करावा.

**प्रश्नकर्ता :** प्रकृती नाही सुधरत, पण व्यवहार तर सुधारला पाहिजे ना?

**दादाश्री :** व्यवहार तर लोकांना करताच येत नाही. जर कधी व्यवहार करता आले असते तरी खूप झाले! व्यवहार तर समजलेच नाहीत. व्यवहार म्हणजे काय? वरच्या वर. व्यवहार म्हणजे सत्य नाही. हे तर व्यवहारालाच सत्य मानून घेतले आहे. व्यवहाराचे सत्य म्हणजे रिलेटिव सत्य. म्हणून इथल्या नोटा खऱ्या असो अथवा नकली असो दोन्ही तिथे (मोक्षच्या) स्टेशनवर उपयोगी पडणार नाहीत. म्हणून त्यांना सोडा आणि आपण आपले काम साधून घ्या. व्यवहार म्हणजे दिलेले परत करायचे, तेच. आता कोणी म्हटले की, तुझ्यात अक्कल नाही. तर समजून जा की हे मी दिले होते, ते परत आले. हे असे जर समजलात तर त्याला व्यवहार म्हणतात. आजकाल असा व्यवहार कोणाचाच नाही. ज्याचा व्यवहार व्यवहार आहे. त्याचा निश्चय निश्चय आहे.

कोणी म्हणेल की, भाऊ, त्याला सरळ करा, 'अरे!' तिला सरळ करायला जाशील तर, तूच वाकडा होशील. म्हणून वाइफला सरळ करायला जाऊ नका, जशी आहे तशी तिला 'करेक्ट' म्हणा. आपल्याला तिच्याबरोबर कायमचे देणे-घेणे असेल तर ती गोष्ट वेगळी आहे. हे तर एका जन्मानंतर कुठल्याकुठे विखरुन जातील. दोघांचा मरणकाळ भिन्न, दोघांचे कर्म भिन्न. काही घेणे पण नाही आणि देणे पण नाही. इथून नंतर ती कोणाकडे जाईल

कोणास माहित? आपण तिला सरळ करावे आणि पुढल्या जन्मी ती जाईल दुसऱ्याच्या हिस्स्यात!

जो स्वत: सरळ झाला असेल, तोच इतरांना सरळ करु शकतो. प्रकृती दमदाटीने सुधरत नाही, वशमध्ये पण येत नाही. दमदाटीने तर संसार उभा झाला आहे. दमदाटीने तर त्यांची प्रकृती अधिक बिगडेल.

समोरच्याला सुधारण्यासाठी जर तुम्ही दयाळू असाल तर ओरडू नका. त्याला सुधारण्यासाठी त्याच्या बरोबरीचा त्याला मिळेलच.

ज्यांचे आपण रक्षण करतो, त्याचे भक्षण कसे करायचे? जो आपल्या आश्रयात आला त्याचे रक्षण करणे, हेच मुख्य ध्येय असले पाहिजे. त्याने अपराध केला असेल तरीही त्याचे रक्षण केले पाहिजे. हे परदेशी सैनिक इथे (भारतात) आता कैदी आहेत, तरीही आपले सैनिक त्यांची कशी रक्षा करत आहेत, तेव्हा हे तर आपल्या घरातलेच आहेत ना! बाहेरच्यांसोबत मांजर बनून राहता, तिथे भांडण नाही करत आणि घरातच सर्वकाही करतात.

## ९. कॉमनसेन्स ने एडजस्ट एवरीव्हेर

कोणाबरोबर मतभेद होणे आणि भिंतीला आपटणे दोन्ही समान आहे, ह्या दोन्हीमध्ये फरक नाही. भिंतीवर आपटला, ते न दिसल्यामुळे आपटतो. आणि जे मतभेद होतात, ते सुद्धा न दिसल्यामुळेच होतात. पुढचे त्याला दिसत नाही, पुढचे सोल्युशन त्याला मिळत नाही, त्यामुळे मतभेद होतात. क्रोध होतो तो पण न दिसल्यामुळेच होतो. हे जे क्रोध-मान-माया-लोभ वैगरे करता, ते पण न दिसल्यामुळेच करतात. तर ह्या गोष्टिला समजले पाहिजे ना ! ज्यास लागले त्याचा दोष, त्यात भिंतीची काही चुक आहे का ? आता ह्या जगात सगळ्या भिंतीच आहेत. भिंतीला आपटल्यावर आपण तिच्या बरोबर खरे-खोटे करायला नाही ना जात की, हे माझेच बरोबर आहे. असा वाद घालून भांडत तर नाही ना ?

जे आपटले जातात त्या सर्व भिंतीच आहेत असे जर आपण समजून घेतले असेल तर मग दरवाजा शोधायचा असेल तर अंधारातही दरवाजा सापडेल. असे हाताने चाचपडत-चाचपडत जाल तर दरवाजा सापडतो.

सापडतो की नाही ? मग तिथून निसटून जा. असा नियम पाळला पाहिजे की, कोणासोबतही संघर्षात पडायचे नाही.

## १०. दोन डिपार्टमेन्ट वेगळे

पुरुषांनी स्त्रियांच्या बाबतीत हस्तक्षेप केले नाही पाहिजे आणि स्त्रियांनीही पुरुषांच्या बाबतीत हस्तक्षेप नाही केले पाहिजे. प्रत्येकांनी आपापल्या डिपार्टमेन्ट मध्ये राहिले पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** स्त्रियांचे डिपार्टमेन्ट कोणते ? कोणत्या कोणत्या बाबतीत पुरुषांनी हस्तक्षेप करू नये.

**दादाश्री :** असे आहे की, जेवण काय बनवावे, घर कसे चालवावे, हे सर्व स्त्रियांचे डिपार्टमेन्ट आहेत. ती गहू कुठून आणते, कुठून आणत नाही हे आपल्याला जाणून घेण्याची काय गरज आहे ? ती जर तुम्हाला सांगेल की गहू आणायला त्रास होत आहे तर ती गोष्ट वेगळी आहे. परंतु ती आपणास सांगत नसेल, राशन दाखवत नसेल, तर आपल्याला तिच्या डिपार्टमेन्ट मध्ये ढवळाढवळ करण्याची गरजच काय आहे ? आज खीर बनव, आज जिलेबी बनव, हे ही आपल्याला सांगण्याची काय गरज आहे ? टाईम येईल तेव्हा ती बनवून वाढेल.

त्यांचा 'डिपार्टमेन्ट' त्यांच्यासाठी स्वतंत्र आहे ! त्यातून कधी खूप इच्छा झाली तर सांगा, 'आज लाडू बनवा.' सांगण्यास मनाई नाही, पण विनाकारण अशी-तशी बोंबाबोंम करता की, कढी खारट झाली, खारट झाली, ह्या सर्व निरर्थक गोष्टी आहेत.

जो पुरुष घरातल्या भानगडीत हात घालत नाही, त्याला खरा पुरुष म्हणतात. अन्यथा तो स्त्री सारखाच असतो. काही पुरुष तर (स्वयंपाक) घरात जाऊन मसाल्याचे डब्बे तपासतात, की 'हे दोन महिन्यापूर्वी आणले होते, आणि इतक्या लवकर संपले, अरे, असे सर्व पाहतोस, तर कसे पार पडेल ? ज्यांचे हे 'डिपार्टमेन्ट' आहे, त्यांना चिंता नसेल ? कारण वस्तू तर वापरल्या जातात आणि नवीन आणल्याही जातात. पण हा तर विनाकारण अति शहाणा बनायला जातो. त्यांच्या स्वयंपाकघराचे डिपार्टमेन्टमध्ये हात घालू नये.

आम्हाला सुद्धा सुरुवातीला तीस वर्षांपर्यंत जरा त्रास झाला होता. पण नंतर निवडून निवडून सर्व निकाल केले आणि डिविजन करुन दिले की स्वयंपाकघर खाते तुमचे आणि कमवायचे खाते आमचे, कमवायचे आम्ही. तुमच्या खात्यात आम्ही दखल करणार नाही आणि आमच्या खात्यात तुम्ही दखल करायची नाही. भाजीपाला त्यांनी घेऊन यायचे.

आमच्या घरची पद्धत तुम्ही पाहिलीत तर खूप सुंदर वाटेल. जोपर्यंत हीराबांची तब्बेत चांगली होती, तोपर्यंत गल्लीच्या नाक्यावर भाजीवाला होता तेथून त्या स्वत: भाजी आणाच्या. तेव्हा आम्ही बसलेले असू, तर हीराबा आम्हाला विचारायच्या, 'काय भाजी आणू?' तेव्हा आम्ही सांगत असू की, 'तुम्हाला जे योग्य वाटते ते आणा.' मग त्या घेऊन येत. पण रोजच्या रोज असेच चालले तर काय होणार? तेव्हा मग विचारायचे बंद करणार, जळो, नेहमी हे काय बोलतात, तुम्हाला ठीक वाटेल ते आणा. म्हणून पाच-सात दिवस हीराबांनी विचारणे बंद केले. तेव्हा मग एक दिवस मी विचारले की, 'कारले का आणले?' तेव्हा त्या म्हणाल्या, मी जेव्हा विचारते तेव्हा तुम्ही म्हणता, 'तुम्हाला जे ठिक वाटेल ते आणा, आणि आज ठिक वाटले ते आणले तर तुम्ही चुक काढता?' तेव्हा मी म्हणालो, 'नाही, आपण अशी पद्धत ठेवायची, तुम्ही मला विचारायचे काय भाजी आणू? तेव्हा मी म्हणेल, तुम्हाला जे ठिक वाटेल ते आणा,' आपली ही पद्धत चालू ठेवा. आणि त्यांनी ही परंपरा शेवटपर्यंत टिकवली. ह्यात पाहणाऱ्यांना पण शोभेसे वाटेल की, वाह ! काय ह्या घरची पद्धत !

अर्थात् आपला व्यवहार बाहेर चांगला दिसायला हवा. एकपक्षी झाले नाही पाहिजे. महावीर भगवान कसे पक्के होते ! व्यवहार आणि निश्चच दोन्ही वेगळे, एकपक्षी नाही. लोक पाहत नाही का व्यवहार? रोजच पाहत होते. 'रोज ह्या बाबतीत हीराबा तुम्हाला विचारतात?' मी म्हणालो, 'हो रोजच विचारतात.' 'तर मग थकत नाहीत?' मी म्हणालो, 'अरे, का थकणार ? त्यांना काही मजले चढायचे होते की डोंगर चढायचे होते?' 'अर्थात् आपला दोघांचा व्यवहार असा असावा की लोक पाहतच राहतील.'

**प्रश्नकर्ता :** स्त्रियांनी पुरुषांच्या कोणत्या बाबतीत दखल करु नये ?

**दादाश्री :** पुरुषांच्या कुठल्याही बाबतीत ढवळा ढवळ करु नये. 'दुकानात किती माल आला? किती गेला? आज उशिरा का आलात?' तेव्हा मग त्यांना सांगावे लागेल की, 'आज नऊची गाडी चुकली' तेव्हा पत्नी म्हणेल की, 'असे कुठे फिरत होता की गाडी चुकली?' मग ते चिडतात, त्यांच्या मनात येते की, जर देवाने पण असे विचारले असते तर त्याला पण मारले असते, परंतु इथे काय करणार आता? अर्थात् विनाकारण बाचाबाची करता. मस्त बासमती भात बनवता आणि त्यात मग खडे घालून खातात, त्यात काय चव येणार? स्त्री-पुरुषांनी एकमेकांना 'हेल्प' केली पाहिजे. पतीला काही चिंता होत असेल, तर पत्नीला असे बोलले पाहिजे की, पतीची चिंता दूर होईल. आणि पतीने पण पत्नीला त्रास होणार नाही, याची दक्षता घ्यायला हवी. पतीलाही पण समजले पाहिजे की, पत्नीला घरी मुलं किती हैरान करत असतील? घरात काही तुटले-फुटले तर पुरुषांनी तक्रार करायला नको. पण तरीही ते ओरडतात की, 'गेल्या वर्षी चांगल्यातले डझनभर कप-बशी आणले होते, ते सर्व तुम्ही कसे काय फोडून टाकले? सर्व संपवून टाकले.' मग पत्नी मनात म्हणेल की, 'मी फोडून टाकले? मला काय ते खायचे होते, फुटले तर फुटले त्यात मी काय करु?' आता त्यावर ही भांडतात, जिथे काही घेणे-देणे नाही, जिथे भांडण्यासारखे काहीच कारण नाही तिथेही भांडतात?

डिविजन (विभाजन) तर मी आधीच, लहानपणीच करुन दिले होते की, हे स्वयंपाकघर खाते त्यांचे आणि धंद्याचे खाते माझे. लहानपणापासून घरातल्या स्त्रीने जर धंद्यातला हिशोब विचारला की माझे डोके फिरायचे. कारण ही तुमची लाईन नाही, आणि तुम्ही विधाउट एनी कनेक्शन विचारता? कनेक्शन (अनुसंधान) सहित असले पाहिजे.

त्यांनी विचारले 'ह्या वर्षी किती कमवले?' मी म्हणालो, 'आपल्याला असे नाही विचारले पाहिजे. हे आमचे पर्सनल मेटर झाले. तुम्ही असे विचारत आहात? जर मी उद्या कोणाला पाचशे रुपये देऊन आलो तर तुम्ही माझे तेल काढाल.' कोणाला तरी पैसे देऊन आलो तर म्हणाल, असे लोकांना पैसे वाटत फिरलात तर पैसे संपून जातील. असे तुम्ही माझे तेल काढाल. म्हणून पर्सनल मेटर मध्ये तुम्ही हात घालू नये.

# ११. संशय जाळेल सोन्याची लंका

आजकाल घरात भांडण जास्त करुन संशयामुळे होत असतात. त्याचे असे आहे की, संशयामुळे स्पंदन उडतात आणि त्यामुळे भडका उडतो. आणि जर निसंशय झालो तर भडका आपोआपच शांत होऊन जाईल. पति-पत्नी दोघेही संशयी असतील तर भडका कसा शांत होणार ? दोघांपैकी एकाला तर निसंशय व्हायलाच हवे, तेव्हाच सुटका होऊ शकते. आई-वडिलांच्या भांडणामुळे मुलांवरील संस्कार बिगडतात. मुलांचे संस्कार बिघडू नये यासाठी दोघांनी समंजसपणे निकाल आणला पाहिजे. हा संशय काढणार कोण? आपले हे 'ज्ञान' तर संपूर्ण निसंशय बनवेल असे आहे !

एका पतीला आपल्या पत्नी वर शंका झाली. तर हे बंद होईल? नाही. ही तर आयुष्यभराची शंका म्हटली जाते. काम झाले ना, पुण्यशाली( !) पुण्यशाली माणसांनाच होते ना ! अश्याचप्रकारे पत्नीला पण पतीवर शंका झाली, तर ती ही आयुष्यभर जात नाही.

**प्रश्नकर्ता :** शंका करायची नसते तरीही होऊन जाते त्याचे काय ?

**दादाश्री :** आपलेपणा, मालकीपणा (स्वामित्व). माझा पती आहे ! पती भले असेल, पती असण्यात हरकत नाही. 'माझा' बोलण्यातही हरकत नाही, ममता ठेवायची नाही. 'माझा पती' असे बोला, पण ममता ठेवू नका.

या जगात दोन गोष्टी ठेवा. वरवर विश्वास शोधा आणि वरवर संशय करा. खोलात जाऊ नका. आणि शेवटी, विश्वास शोधणारा 'मेड' होऊन जातो. मेन्टल हॉस्पिटलमध्ये लोकं पाठवून देतील. हे पत्नीला एखाद्या दिवशी बोलतात, 'तू शुद्ध आहेस ह्याची खात्री काय?' तेव्हा वाईफ काय बोलेल, 'जंगली कुठला.'

ह्या मुली बाहेर शिकायला जातात, त्यांच्यावरही शंका! वाईफ वर सुद्धा संशय! असा सर्व विश्वासघात, दगाफटका ! आता घरातही विश्वासघातच आहे ना! ह्या कलियुगात स्वत:च्या घरातच विश्वासघात होतो. कलियुग म्हणजे विश्वासघाताचा काळ. कपट आणि विश्वासघात, कपट आणि विश्वासघात ! ह्यात कोणत्या सुखासाठी काय करत आहोत ? ह्याचेही भानच रहात नाही, बेभानपणे ! निर्मळ बुद्धिवाल्यांकडे कपट आणि

विश्वासघात नसतो. कपट आणि विश्वासघात हे तर 'फुलिश' (मूर्ख) लोकांकडे असतो. कलियुगात 'फुलिश'च एकत्र झाले आहेत ना !

लोकं म्हणत असतील की, हा नालायक माणूस आहे, तरीही आपण त्याला लायक म्हणावे. कारण कदाचित नालायक नसेलही आणि त्यास नालायक म्हणाल तर तो मोठा दोष ठरेल. सती असेल आणि जर वेश्या म्हणाल तर भयंकर गुन्हा आहे, आणि त्यासाठी कितीतरी जन्म भोगावे लागतील. म्हणून कुणाच्याही चारित्र्याबद्दल बोलू नका. कारण की ते खोटे निघाले तर? लोकांच्या बोलण्याने आपणही बोलू लागलो तर, त्यात आपली काय किंमत राहिली? आम्ही तर असे कधीही कोणाच्या बाबतीत बोलत नाही, आणि कुणालाही बोललो नाही, मी तर ह्यात हातच घालत नाही ना ! ती जाबबदारी कोण घेणार? कोणाच्याही चारित्र्यावर शंका करु नये. त्यात मोठी जोखीम आहे. आम्ही तर शंका कधीही करत नाही. आपण जोखीम कशाला घ्यायची?

एका माणसाला त्याच्या वाईफवर सारखी शंका येत होती. मी त्याला विचारले की कशावरुन शंका होते? तू पाहिलेस त्यामुळे शंका घेतोस? जेव्हा पाहिले नव्हतेस, तेव्हा असे घडत नव्हेत का? लोक तर जो पकडला जातो त्यालाच चोर म्हणतात, पण जे पकडले गेले नाही ते सर्व आतून चोरच आहेत. परंतु हे तर, जो पकडला गेला त्यालाच चोर म्हणतात. अरे! त्याला चोर कशाला म्हणता? तो तर भोळा होता, लहान-सहान चोरी केली म्हणून पकडला गेला, मोठी चोरी करणारा पकडला जातो का?

अर्थात् ज्यांना पत्नीच्या चारित्र्यसंबंधी शांती हवी असेल, तर त्यांनी एकदम काळी कुरुप बायको केली पाहिजे, म्हणजे तिचे कोणी ग्राहकच नाही बनणार, कोणी तिला विचारणारच नाही.... आणि ती स्वत:च असे म्हणेल की, मला कोणी विचारणारच नाही. हा एक नवरा मिळाला आहे तोच सांभळतो. म्हणजे ती तुमच्या प्रती सिन्सियर राहिल, खूप' सिन्सियर राहिल. जर, सुंदर पत्नी असेल तर, तिला लोक भोगतीलच. सुंदर आहे म्हणून लोकांची दृष्टि बिगडणारच! कोणी सुंदर देखणी बायको केली असेल तर, आम्हाला विचार येतो की काय दशा होणार त्याची ! काळी कुरुप असेल, तरच सेफ साइड राहिल.

पत्नी खूप सुंदर असेल, तर तो भगवंताला पण विसरेल ना! आणि पती देखणा असेल तर स्त्री पण भगवंताला विसरेल! म्हणून सर्वकाही रितसर असलेले बरे. आमचे वडिलधारी लोकं तर असे बोलत की, 'शेत ठेवा सपाट आणि पत्नी ठेवा कोबाड (कुरुप).'

लोक तर कसे आहेत की, जिथे 'हॉटेल' दिसेल तिथे 'जेवतात' अर्थात् शंका करण्यासारखे जगत नाही. शंकाच दु:खदायी आहे.

हे लोक तर 'वाईफ' जरा उशिरा घरी आली तरी शंका करतात. शंका करण्यासारखे नाही. ऋणानुबंधाच्या बाहेर काहीही होणार नाही. ती घरी आल्यावर तिला समजवा, पण शंका करु नका. शंका केल्याने उलट अधिक बिघडते. हो चेतावणी जरुर द्या, पण मनात शंका घेऊ नका. शंका करणारे मोक्ष गमवून बसतात. म्हणून आपल्याला जर सुटायचे असेल, मोक्षाला ज्याचे असेल तर शंका करु नका. कोणी परक्या माणसाला तुमच्या बायकोच्या गळ्यात हात घालून फिरताना तुम्ही जर पहिले, तर काय आपण विष खायचे?

अर्थात्, कुठल्याही बाबतीत शंका होऊ लागली तर शंका ठेवू नका. आपण जागृत रहा, पण समोरच्यावर शंका करु नका. शंका आपल्याला मारुन टाकते. समोरच्याचे जे व्हायचे असेल ते होईल, पण आपल्याला तर शंकाच मारुन टाकेल. कारण की ही शंका तर माणसाला मरेपर्यंत सोडत नाही. शकां केल्याने माणसांचा प्रभाव वाढतो का? माणूस जिवंतपणी मेल्यासारखा जगू लागतो. असे होत असते.

## १२. पतीपणाचा गुन्हा

**प्रश्नकर्ता :** कितीतरी लोकं स्त्रियांना कंटाळून घरातून पळून जातात, ते का?

**दादाश्री :** नाही, पळपुटे कशाला बनता? आपण परमात्मा आहोत. तर मग आपल्याला पळण्याची काय गरज आहे? आपण तिचा समभावे निकाल करायचा.

**प्रश्नकर्ता :** समभावे निकाल करायचा तर कश्याप्रकारे करायचा? त्यासाठी मनात असा भाव धरायचा की हे मागच्या जन्माचे आले आहे?

**दादाश्री :** एवढ्याने निकाल होणार नाही. निकाल अर्थात् समोरच्याला फोन केला पाहिजे. त्याच्या आत्म्याला कळवावे लागेल. त्या आत्म्याकडे, आपली चुक झाली आहे असे कबुल करावे लागेल. अर्थात् खूप मोठे प्रतिक्रमण करावे लागेल.

**प्रश्नकर्ता :** कोणी आपला अपमान केला, तरीही आपल्याला त्याचे प्रतिक्रमण करावे लागेल?

**दादाश्री :** मान देणार तेव्हा नाही करायचे, अपमान करेल तरच प्रतिक्रमण करायचे आहे, प्रतिक्रमण केल्याने आपल्याला अपमान करणाऱ्यावर द्वेष होतच नाही, एवढेच नाही, तर त्याच्यावर चांगला परिणामही होणार, अर्थात त्यालाही आपल्यावर द्वेषभाव भाव होणार नाही, ही तर झाली पहिली स्टेप, पण त्यानंतर त्याला बातमी सुद्धा पोहचते.

**प्रश्नकर्ता :** त्याच्या आत्माला बातमी पोहचते का?

**दादाश्री :** हो, जरुर पोहचते. मग तो आत्मा त्याच्या पुद्‌गलला सुद्धा कळवतो की, 'भाऊ, तुझ्यासाठी फोन आला आहे.' आपले हे प्रतिक्रमण, अतिक्रमणासाठी आहे, क्रमणासाठी नाही.

**प्रश्नकर्ता :** खूप प्रतिक्रमण करावे लागतील?

**दादाश्री :** जितक्या स्पीडने आपल्याला घर बांधायचे आहे, तितके कामगार आपल्याला वाढवावे लागतील. त्याचे असे आहे की, बाहेरच्या लोकांचे प्रतिक्रमण नाही केले तरी चालेल, पण आपल्या आजू-बाजूचे आणि घरातील जवळच्या व्यक्तींचे प्रतिक्रमण खूप करावे लागतील. घरातल्या लोकांसाठी मनात अशी भावना ठेवा की, एकाच घरात जन्मलो, एकत्र रहातो, तर या सर्वांनाही कधीतरी मोक्ष मार्गावर यावे.

एक भाऊ माझ्याकडे आले होते. ते मला सांगू लागले, 'दादा, मी लग्न तर केले, पण मला माझी बायको आवडत नाही.' मी म्हणालो, 'का बरे? न आवडण्याचे काय कारण आहे?' तेव्हा तो म्हणाला, 'ती जरा लंगडी आहे, लंगडते.' 'तर मग तुझ्या बायकोला तू आवडतोस की नाही?' तेव्हा तो म्हणाला, 'दादा, मी तर आवडेल असाच आहे ना ! मी देखणा आहे,

शिकलो-सवरलेलो, पैसे कमावतो, आणि शरीरानेही सुदृढ आहे.' तर मग ह्यात चुक तुझीच आहे. तु अशी कोणती चुक केली होतीस की तुला लंगडी बायको मिळाली, आणि तिने किती चांगले पुण्य केले असतील की तिला तुझ्यासारखा इतका चांगला नवरा मिळाला? अरे, हे तर आपले केलेलेच आपल्या समोर येते, तर त्यात समोरच्याचे दोष का पाहतोस? जा, केलेली चुक तु भोगून घे, आणि पुन्हा अशी चुक करु नकोस. तो समजून गेला आणि त्याची लाईफ फ्रेक्चर होता होता सुधरली.

## १३. दादांच्या दृष्टिने चला, पतींनो...

**प्रश्नकर्ता :** माझी वाईफ असे सांगते की, तुमच्या आई-वडीलांना आपल्या सोबत ठेवायचे नाही आणि बोलवायचेही नाही, तर काय करावे?

**दादाश्री :** तर समंजसपणे काम घ्या, डेमोक्रेटिक (लोकसत्ताक) पद्धतीने काम करावे. आपण तिच्या आई-वडिलांना आपल्या घरी बोलवावे, आणि त्यांची खूप सेवा करावी.....

**प्रश्नकर्ता :** आई-वडिल वृद्ध असतील, वयस्कर असतील, म्हणजे एकीकडे आई-वडिल आहेत आणि दुसरीकडे वाईफ आहे, तर या दोघांत आधी कोणाचे ऐकावे?

**दादाश्री :** वाईफ बरोबर इतके चांगले संबंध ठेवा की, ती स्वत: आपल्याला असे म्हणेल की, तुम्ही जरा तुमच्या आई-वडिलांची काळजी घ्या ना! असे का वागता? पत्नी समोर आई-वडिलांबद्दल जरा उलट-सुलट बोला. पण आपली लोकं तर काय म्हणतात? माझ्या आई सारखी कोणाचीही आई नाही, तू बडबड करु नकोस. मग जेव्हा ती उलट फिरेल, तेव्हा तुम्ही पण बोला की, आईचा स्वभाव आजकाल असाच झाला आहे. इन्डियन माइंडला उलट चालायची सवय असते. इन्डियन माइंड आहे ना!

तुला माहित आहे, लोकं तर वाईफला गुरु बनवतात असे आहेत?

**प्रश्नकर्ता :** हो, माहित आहे.

**दादाश्री :** तिला गुरु करण्यासारखे नाही, नाहीतर आई-वडील आणि

सारे कुटुंब अडचणीत येईल आणि गुरु केल्यावर स्वतःसुद्धा अडचणीत येईल. त्याला पण खेळण्यासारखे खेळावे लागते ना?! पण माझ्याकडे येणाऱ्यांचे असे होत नाही. माझ्याकडे ऑल राइट ! हिंसकभावच उडून जातात ना ! हिंसा करण्याचा विचारही येत नाही. दुसऱ्यांना कसे सुख देता येईल हाच विचार येतो !

नवीन नवरीसोबत पण नीट वागावे लागते. सर्वकाही नवीन नवीन असेल तर सांभाळून घ्यायला हवे. पहिल्याच दिवसी पत्नी रुसली आणि तुम्ही सुद्धा रुसलात तर केव्हा पार येणार. कदाचित पत्नी रुसली असेल तर तुम्ही हळूच तिला सांगा, 'घाबरु नकोस, आपण दोघे एकच आहोत.' कसेही करुन समाजावून उमजावून समाधान करा. ती पण रुसेल आणि तु पण रुसलास मग काय उरले ? काम घेता तर आले पाहिजे ना!

**प्रश्नकर्ता :** या स्त्रिया काम करुन खूप थकून जातात. काही काम सांगितले, तर बहाणे बनवतात की, मी आज खूप थकले आहे, माझे डोके दुखत आहे, कंबर दुखत आहे.

**दादाश्री :** असे असेल ना, तर आपण तिला सकाळीच सांगायचे की, हे बघ तुझ्याने काम होणार नाही, तू थकली आहेस. तेव्हा तिला जोश येईल की नाही, तुम्ही चुपचाप बसा मी करुन घेईल. अर्थात् तुम्हाला कलेने काम घेता आले पाहिजे. अरे! भाजी चिरण्याचीही कला नसेल ना, तर रक्त निघेल.

**प्रश्नकर्ता :** आम्ही जेव्हा गाडीने जातो तेव्हा ती मला सारखी बडबड करत राहते की, गाडी कुठून वळवावी, ब्रेक केव्हा लावावा, असे गाडीत मला बोलतच राहते, सतत टोकत राहते. गाडी अशी चालवा, तशी चालवा!

**दादाश्री :** तर मग तिच्याच हातात द्या ना, गाडी तिला सोपवून द्या. भानगडच नाही, शहाणा माणूस! किट-किट करत असेल तर तिला म्हणावे, घे बाई, तु चालव!

**प्रश्नकर्ता :** तेव्हा ती म्हणेल, 'माझ्यात तर हिम्मत नाही.'

**दादाश्री :** तेव्हा विचारा, का? त्यात तुला काय हरकत आहे ? तुला

काय वरती बांधून ठेवले आहे जे तू असे टोकत राहतेस ! गाडी तिलाच सोपून द्यायची. ड्राईवर असता तर टोकल्यावर कळले असते, हा तर घरचा माणूस आहे म्हणून टोकत राहते.

**प्रश्नकर्ता :** पत्नीची बाजू नाही घेतली तर, घरात भांडणे होतील ना?

**दादाश्री :** पत्नीचीच बाजू घ्यायची. पत्नीची बाजू घेण्यास काही हरकत नाही, कारण पत्नीची बाजू घ्याल तरच रात्री निवांतपणे झोपू शकाल, नाहीतर झोपाल कसे? तिथे काजी बनू नका.

**प्रश्नकर्ता :** शेजाऱ्यांचा पक्ष तर नाहीच घेतला पाहिजे ना?

**दादाश्री :** नाही, तुम्ही नेहमी वादीचेच वकील बना प्रतिवादीचे वकील होऊ नका. तुम्ही ज्या घराचे खाता त्याचेच.... समोरच्याच्या घराची वकीली करता, आणि खाता मात्र ह्या घरचे. म्हणून त्यावेळी समोरच्याचा न्याय मापू नका ! आपली वाईफ अन्यायात असेल तरीही तुम्ही तिच्या प्रमाणे चाला. तिथे न्याय करण्यासारखे नाही की, तुझ्यात अक्कल नाही म्हणून तर.... वगैरे. कारण उद्या जेवायचे इथेच आहे, तु तुझ्याच कंपनीत वकीलात करतोस ! म्हणून प्रतिवादीचा वकील झालास.

**प्रश्नकर्ता :** समोरच्याचे समाधान झाले हे कशावरून समजावे ? समोरच्याचे समाधान झाले, पण त्यात त्याचे अहित होत असेल तर?

**दादाश्री :** ते तुम्हाला पहायचे नाही. समोरच्याचे अहित होत असेल तर ते त्याला पहायचे आहे. तुम्ही समोरच्याचे हित पहा पण हित-अहित पाहण्याची शक्ति आहे का तुमच्यात? तुम्ही स्वतःचेच हित पाहू शकत नाही, तर मग दुसऱ्यांचे हित कसे पाहू शकाल? सर्व आपापल्या क्षमतेनुसार हित पाहत असतात, तेवढे पाहिले हित पाहिजे. परंतु समोरच्याच्या हितासाठी वादविवाद उभे होतील, असे व्हायला नको.

**प्रश्नकर्ता :** समोरच्याचे समाधान करण्याचा आपण प्रयत्न करतो परंतु परिणाम विपरीत येणार आहे, असे आपल्याला माहित असेल, तेव्हा काय करावे?

**दादाश्री :** परिणाम कसाही येवो, आपल्याला तर 'समोरच्याचे समाधान करायचे आहे.' इतके नक्की करा. 'समभावे निकाल' करण्याचे नक्की करा, मग निकाल हो अगर न हो ते आधीच पहायचे नाही, आणि निकाल तर होईल. आज नाही तर उद्या होईल, परवा होईल, जास्त चिकट असेल तर दोन वर्ष, तीन वर्ष किंवा पाच वर्षानेहि होईल. 'वाईफ' सोबतचे ऋणानुबंध खूपच चिकट असतात, मुलांचे पण चिकट असतात, आई-वडिलांचेही चिकट असतात, तिथे जरा जास्त वेळ लागेल. हे सर्व नेहमी तुमच्या बरोबरच राहत असतात तिथे निकाल हळू-हळू होईल. पण तुम्ही नक्की केले आहे की, कसेही करुन आपल्याला 'समभावे निकाल करायचा आहे' तर मग एक ना एक दिवस निकाल होऊनच राहिल, त्याचा अंत येईल.

## १४. 'माझी' चे आटे उलगडतील असे

लग्नाच्या वेळी मंडपात बसता ना ? मंडपात बसता तेव्हा असे पाहता, हं, ही माझी वाईफ, म्हणजे पहिला आटा बसला. माझी वाईफ, माझी वाईफ, माझी वाईफ..... लग्नासाठी बसल्यापासूनच आटे फिरवायचे सुरु करतो, ते आजपर्यंत आटे फिरवतच आहोत तर आतापर्यंत किती आटे बसले असतील ! आता ते कश्याप्रकारे उलगडतील. ममतेचे आटे लागले !

आता, 'नाही माझी, नाही माझी' असे सतत अजपाजप करा! 'ही स्त्री माझी नाही, नाही माझी' बोला म्हणजे आटे उलटे फिरतील. पन्नास हजारवेळा माझी-माझी म्हणून जे आटे फिरवले आहेत, ते 'नाही माझी' चे पन्नास हजार आटे उलटे फिरवा तेव्हा उलगडतील ! एका माणसाच्या पत्नीच्या मरणाला दहा वर्ष झाली होती, तरीही तो तिला विसरु शकत नव्हता आणि सतत रडत रहायचा. हे कसले भूत आहे ? मी त्याला 'नाही माझी, नाही माझी' बोलण्यास सांगितले. तेव्हा त्याने काय केले ? तीन दिवस 'नाही माझी, नाही माझी' बोलतच राहिला, सतत बोलतच राहिला. तेव्हा मग त्याचे रडायचे थांबले! हे सर्व तर आटेच फिरवले गेले आहेत आणि त्यामुळेच ही फजिती झाली आहे. म्हणजे हे सर्व कल्पित आहे. मला काय सांगायचे आहे ते तुम्हाला समजले ? आता असा सरळ रस्ता कोण दाखवणार ?

दिवसभर काम करता-करता पतीचे प्रतिक्रमण करत रहायचे. एका दिवसात सहा महिन्याचे वैर सुटून जाईल, आणि अर्धा दिवस केले तर, तीन महिन्याचे वैर तरी सुटेल. लग्नापूर्वी नवऱ्यावर ममता होती? नाही ना. मग ही ममता केव्हापासून बांधली गेली? लग्नाच्या वेळी मंडपात समोरासमोर बसलात त्यावेळी तु नक्की केले की, 'हे माझे पती आले. जरा जाड आहेत आणि सावळे ही आहेत.' मग त्यानेही नक्की केले की, 'ही माझी पत्नी आली.' तेव्हापासूनच जे 'माझे-माझी'चे आटे फिरले गेले ते आटे फिरतच राहिले. ही पंधरा वर्षाची फिल्म आहे अर्थात तू त्याला 'नाही माझा, नाही माझा' करशील तर ते आटे उलगडतील आणि ममता सुटेल. हे तर लग्न झाले तेव्हापासून अभिप्राय बांधला गेला, 'प्रिज्युडीस' (पूर्वग्रह) निर्माण झाला की, 'हे असे आहेत, तसे आहेत.' पण त्या पूर्वी असे काही होते का? आता तर तुम्हाला मनात नक्की करायचे आहे की, 'जे आहे ते हेच आहे.' आणि आपण स्वत: पसंत करुन आणले आहे. आता पती बदलता येईल का?

## १५. परमात्म प्रेमाची ओळख

ह्या संसारात जर कोणी म्हणेल की, ह्या स्त्रीचे प्रेम, हे प्रेम नाही ? तेव्हा मी त्यांना समजावेल की, जे प्रेम कमी-जास्त होते ते खरे प्रेम नाही. तुम्ही हिऱ्यांच्या कुड्या आणून दिल्या तर त्या दिवशी तिचे प्रेम खूप वाढते, आणि जर कुड्या नाही आणल्या तर प्रेम कमी होते, हे खरे प्रेम म्हणत नाही.

**प्रश्नकर्ता :** खरे प्रेम वाढत-घटत नाही, तर त्याचे स्वरुप कसे असते?

**दादाश्री :** ते वाढत-घटत नाही. जेव्हा पहाल तेव्हा प्रेम जसेच्या तसेच दिसते. हे तर तुम्ही त्यांचे काम करुन दिले तर त्यांचे तुमच्यावर प्रेम राहते. आणि काम केले नाही तर प्रेम राहत नाही. यास प्रेम कसे म्हणायचे?

अर्थात् जिथे स्वार्थ नाही तिथे शुद्ध प्रेम असते. स्वार्थ केव्हा नसतो, तर जेव्हा तुझे-माझे होत नाही तेव्हा. 'ज्ञान' असते तेव्हा माझे-तुझे होत नाही. 'ज्ञान' शिवाय तर माझे-तुझे होतेच ना?

ही तर सर्व रॉंग बिलीफ (अज्ञान मान्यता) आहे. 'मी चंदुभाई आहे' ही रॉंग बिलीफ आहे. मग घरी गेल्यावर आपण विचाराले की हे कोण आहेत? तेव्हा ते बोलतात, मला नाही ओळखले? या बाईचा मी मालक (नवरा-धनी) आहे. ओहोहोहो ! आला मोठा मालक ! जणू ह्या मालकाचा कोणी मालकच नसेल, असे बोलतो? मालकाचा कोणी मालक असेल की नाही ? तर मग वरच्या मालकाची पत्नी तुम्ही झालात आणि तुमची पत्नी ही झाली. ह्या गोंधळात कशाला पडायचे? मालक व्हायचेच कशाला? आमचे 'कम्पेनियन' (सहचारी) आहेत, असे म्हणायला काय हरकत आहे?

**प्रश्नकर्ता :** दादांनी खूप 'मॉर्डन' भाषा वापरली.

**दादाश्री :** तर काय मग? त्यामुळे टसल (संघर्ष) कमी होणार ना ! हो, एका रुममध्ये दोन 'कम्पेनियन' राहत असतील, तर एक जण चहा बनवणार आणि दुसरा पिणार आणि दुसरा त्याबदल्यात त्याचे काम करुन देईल. असे करुन 'कम्पेनियन' चालत असते.

**प्रश्नकर्ता :** 'कम्पेनियन'मध्ये आसक्ति (मोह) असते की नाही ?

**दादाश्री :** ह्यात आसक्ति आहे पण ही आसक्ति अग्नी सारखी नसते. हे तर शब्दच अतिशय आसक्तिवाले आहेत. मालक आणि मालकीण ह्या शब्दातच इतकी गाढ आसक्ति भरली आहे ना की, 'कम्पेनियन' म्हणाल तर जरा आसक्ति कमी होईल.

एका गृहास्थांची बायको २० वर्षांपूर्वी वारली होती. तर एकजण मला म्हणाला की, 'ह्या काकांना मी रडवू का?' मी विचारले, 'कसे रडवशील?' ह्या वयात तर ते नाही रडायचे. तेव्हा तो म्हणाला, 'पहा, ते किती सेन्सिटिव (भावूक) आहेत?' मग तो काकांना म्हणाला, 'काय काका, काकींच्या बाबतीत तर विचारुच नका! काय त्यांचा स्वभाव होता!' तो असे बोलतच होता की, काकांना खरोखरच रडू येऊ लागले! अरे, कसे घनचक्कर! साठाव्या वर्षी सुद्धा बायकोसाठी रडू येते! हे तर कसले घनचक्कर आहेत? हे लोक तर सिनेमात पण रडतात ना? त्यात कोणी मेले असेल तर पाहणाऱ्यांना पण रडू येते!

**प्रश्नकर्ता :** ही आसक्ति का सुटत नाही?

**दादाश्री :** ती तर नाही सुटणार, कारण 'माझी-माझी' म्हणत, बांधले ना! आता 'नाही माझी, नाही माझी' असे जप केल्यावर, सुटतील. हे तर जितके आटे फिरवले असतील, तितके आटे सोडवावे तर लागतीलच ना ! अर्थात् ही तर फक्त आसक्तिच आहे. चेतन सारखी वस्तूच नाही. हे सर्व तर चावी भरलेले पुतळे आहेत.

आणि जिथे आसक्ति आहे तिथे आक्षेप आल्याशिवाय रहातच नाही. हा आसक्तिचा स्वभाव आहे. आसक्ति आहे म्हणून आक्षेप करणारच की, 'तुम्ही असे आहात नी, तुम्ही तसे आहात ! तुम्ही असे नी तु अशी' असे नाही का बोलत? तुमच्या गावी असे बोलतात की नाही बोलत? असे बोलतात ते आसक्तिमुळे.

ह्या मुली नवरा पसंत करतात, नीट पारखून-निरखून पसंत करतात मग त्यानंतरही भांडत नसतील? भांडतात खरे? तर मग ह्याला प्रेम म्हणतच नाही ना ! प्रेम तर कायमचे असते. जेव्हा बघाल तेव्हा तसेच प्रेम, तसेच दिसेल, त्यास प्रेम म्हणतात आणि तिथे आश्वासन घेऊ शकता. हे तर तुम्हाला प्रेम राहत असेल, आणि ती रुसून बसली असेल तर, तेव्हा म्हणाल, जळो हे कसले तुझे प्रेम! त्यास फेक इथून गटारीत! तोंड फुगवून फिरत असेल तर अश्या प्रेमाचे काय करायचे? तुम्हाला काय वाटते?

जिथे खूप प्रेम असते, तिथेच नावड होते, हा मनुष्य स्वभाव आहे.

ही लोक तर सिनेमा पहायला जाताना पूर्णतः आसक्तिच्या धुंदीतच असतात पण परत येताना 'तु बिन अक्कलेची आहे' असे बोलतात. तेव्हा ती सुद्धा म्हणते, 'तुमच्यात तरी कुठे लायकी आहे?!' अशी बडबड करत करत घरी येतात. तो अक्कल शोधतो, तर ही लायकी बधते !

प्रेमाने सुधरतात, हे सर्व सुधरवायचे असेल, तर प्रेमानेच सुधरेल. ह्या सर्वांना मी सुधारतो ना, ते प्रेमाने सुधारतो. आम्ही प्रेमानेच बोलतो त्यामुळे गोष्ट बिगडत नाही. आणि जरापण द्वेषाने बोलाल तर ती गोष्ट बिगडून जाईल. दुधात दही घातले नसेल आणि अशीच जरा हवा लागली, तरी पण त्या दुधाचे दही बनून जाते.

**प्रश्नकर्ता :** प्रेम आणि आसक्ति यातील फरक जरा समजवा.

**दादाश्री :** जे विकृत प्रेम आहे, त्याचेच नांव आसक्ति. या जगात आपण ज्याला प्रेम म्हणतो, ते विकृत प्रेम म्हटले जाते आणि यालाच आसक्ति म्हणतात.

हे तर सुई आणि चुंबकामध्ये जशी आसक्ति असते, तशी ही आसक्ति आहे. ह्यात प्रेमासारखी वस्तूच नाही. प्रेम नाहीच कुठेही. हे तर सुई आणि चुंबकाच्या आकर्षणामुळे तुम्हाला असे वाटते की, मला प्रेम आहे आणि त्यामुळे मी ओढलो जात आहे. पण ही प्रेमासारखी वस्तूच नाही. प्रेम तर, ज्ञानी पुरुषाचे 'प्रेम' हेच प्रेम म्हटले जाते.

या दुनियेत शुद्ध प्रेम हाच परमात्मा आहे, ह्याच्या व्यतिरिक्त दुसरा कोणी परमात्मा ह्या दुनियेत झालाच नाही, आणि होणारही नाही, आणि तिथेच दिल (हृदय) प्रसन्न होते आणि तेव्हा दिलावरी काम होते. नाहीतर दिलावरी काम होऊ शकत नाही. दोन प्रकारेने हृदय प्रसन्न होते. अधोगतीत जायचे असेल तर एखाद्या स्त्रीवर हृदय ओवाळून टाकावे, आणि ऊर्ध्वगतीत जायचे असेल तर ज्ञानीवर हृदय ओवाळून टाकावे आणि हे ज्ञानी पुरुष तर तुम्हाला मोक्षाला घेऊन जातील. दोन्हीही जागी दिलचीच (हृदयाची) जरुरत पडेल, तेव्हाच दिलावरी प्राप्त होते.

अर्थात् ज्या प्रेमात क्रोध-मान-माया-लोभ काहीही नाही, स्त्री नाही, पुरुष नाही, जे प्रेम समान, एकसारखेच रहाते असे शुद्ध प्रेम पाहिल्यावर, माणसाचे हृदय प्रसन्नतेने भरुन येते.

मी प्रेम स्वरुप झालो आहे. ह्या प्रेमातच तुम्ही मग्न व्हाल तेव्हा जग विसरुनच जाल. जग पूर्ण विस्मृत होईल. प्रेमात मग्न झाल्यावर तुमचा संसार उत्तम प्रकारे चालेल. आदर्शमय चालेल.

## १६. लग्न केले म्हणजे 'प्रोमिस टू पे'

हीराबांचा एक डोळा १९४३ मध्ये गेला. त्यांना झामरचा त्रास होता, त्यावर उपचार करताना डॉक्टरांनी जरा असे काही केले की त्याचा दुष्परिणाम डोळ्यांवर झाला आणि त्यामुळे नुकसान झाले.

म्हणून लोकांच्या मनात असे आले की, हा 'नवीन' वर तयार झाला. पुन्हा लग्न लावा. मुलीही पुष्कळ होत्या ना! आणि मुलींच्या आई-वडिलांची इच्छा पण अशी की, कसेही करुन, विहिरीत ढकलूनही मुलींचा निवाडा करा, तेव्हा भादरण गावचे एक पाटील आले. त्यांच्या मेव्हण्यांची मुलगी असेल. म्हणून आले होते. मी विचारले, 'काय काम आहे आपले?' तेव्हा ते म्हणाले, 'आपल्या सोबत असे घडले?' त्यावेळी १९४४ मध्ये माझे वय ३६ वर्ष होते. तेव्हा मी म्हणालो, 'तुम्ही हे विचारायला आलात का?' तेव्हा ते म्हणाले, 'एक तर हीराबांचा डोळा गेला, आणि दुसरे असे की प्रजा (मुलं) ही नाही.' मी म्हणालो, 'प्रजा नाही पण माझ्याजवळ कोणते स्टेटही (राज्य) नाही. बडोदा स्टेट नाही की मला त्यांना द्यायचे आहे. स्टेट असते तर मुलांना दिलेले बरे. पण हे तर माझ्याकडे एखादे घर किंवा थोडीशी जमीन असेल. पण ते ही परत आपल्याला शेतकरीच बनवणार ना !' जर स्टेट असते तर समजा की ठीक होते. मग मी त्यांना विचारले की, आता हे सर्व तुम्ही कशाला विचारत आहात? लग्न केले तेव्हा आम्ही तर हीराबांना प्रोमिस दिले आहे. तर मग एक डोळा गेला म्हणून काय झाले ! दोन्ही गेले तरी मी त्यांना हात धरुन चालवेन.

**प्रश्नकर्ता :** माझे लग्न झाल्यानंतर आम्ही दोघे एकमेकांना ओळखू लागलो आणि आता असे वाटते की निवडण्यात आमची चुक झाली, दोघांच्याही स्वभावात काही मेळ बसत नाही. तर दोघांचा मेळ बसेल असे कसे आणि कश्याप्रकारे करावे जेणे करुन सुखी होता येईल?

**दादाश्री :** हे जे काही तुम्ही बोलत आहात ना, त्यातले एकही वाक्य सत्य नाही. पहिले वाक्य, लग्न झाल्यानंतर दोन्ही व्यक्ति एकमेकांना ओळखू लागतात, पण खरे तर जरा सुद्धा ओळखत नाही. जर ओळखत असते तर ही भानगडच उभी राहीली नसती ना! अर्थात अजिबात ओळखत नाही.

मी तर फक्त बुद्धिच्या 'डिविजनने'(विभाजनाने) सर्व मतभेद संपवून टाकले होते. पण हीराबांची ओळख मला केव्हा झाली? वयाच्या साठव्या वर्षी मला हीराबांची खरी ओळख पटली ! १५ वर्षाचा होतो तेव्हा लग्न केले, ४५ वर्षापर्यंत सातत्याने निरीक्षण केले, तेव्हा त्यांना ओळखले की त्या अश्या आहेत!

**प्रश्नकर्ता :** अर्थात् ज्ञान झाल्यानंतर त्यांना ओळखले.

**दादाश्री :** हो, ज्ञान प्राप्त झाल्यानंतर ओळखूच शकलो. नाहीतर ओळखूच शकलो नसतो, मनुष्य ओळखू शकत नाही. मनुष्य स्वत:लाच ओळखू शकत नाही की, मी कसा आहे! अर्थात एकमेकांना ओळखतो, ह्या वाक्यात काहीही तथ्य नाही. आणि पसंद करण्यात चूकही झालेली नाही.

**प्रश्नकर्ता :** हे समजवा की ओळखायचे कसे? पती ने आपल्या पत्नीला हळू हळू, सूक्ष्मपणे, प्रेमाने कसे ओळखावे, हे समजववा.

**दादाश्री :** ओळखाल केव्हा? एकतर समानतेची संधी द्याल तेव्हा. त्यांनाही स्पेस (मोकळीक) दिली पाहिजे. जसे सोंगट्याने बाजी खेळायला समोरासमोर बसतो, तेव्हा समोरच्याला पण खेळायची समान संधी (डाव) दिली पाहिजे. तरच खेळण्याची मजा येते. पण हे तर समान संधी कसली देतात? आम्ही देतो समान संधी.

**प्रश्नकर्ता :** आपण समानतेची संधी कशाप्रकारे देता? प्रॅक्टिकली कशाप्रकारे देता?

**दादाश्री :** मनाने त्यांना वेगळे समजू देत नाही. ती उलट-सुलट बोलली तरीपण समान आहोत अशाप्रकारे, अर्थात मी दबाव घालत नाही.

अर्थात् समोरच्याची प्रकृती ओळखायची की, ही प्रकृती अशी, अशी आहे. नंतर मग दुसऱ्या काही पद्धती शोधून काढाव्या. मी लोकांकडून दुसऱ्या पद्धतीने काम नाही घेत का? मी सांगितलेले सर्व करतात की नाही? करतात. कारण माझ्यात तसे कौशल्य होते म्हणून नाही, पण मी दुसऱ्या पद्धतीने काम घेतो, म्हणून.

घरात बसणे आवडत नसेल, तरी पण असे बोला की, तुझ्याशिवाय मला करमत नाही! तेव्हा ती पण म्हणेल की तुमच्या शिवाय मला पण करमत नाही. तर मोक्षाला जाऊ शकाल. आता तर दादा भेटले आहेत ना, तर मोक्षाला जाता येईल.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही हीराबांना असे बोलता का ?

**दादाश्री :** हो, हीराबांना मी अजूनही सांगतो ना !

हो। मी सुद्धा, ह्या वयातही हीराबांना असे सांगतो की 'मी तुमच्याशिवाय बाहेरगावी जातो ते मलाही आवडत नाही.' त्या मनात विचार करतात, की मला तर आवडते तर मग ह्यांना का आवडत नसेल? पण मी असे म्हटले तर संसार विस्कटणार नाही. तात्पर्य हेच की आता तू इथून तूप ओत ना बाबा! नाही ओतले तर शुष्कपणा येईल! ओत ना सुंदर भाव! मी कधी बसलो असेल तेव्हा हीराबा मला विचारतात, तुम्हाला माझी सुद्धा आठवण येते? मी म्हणतो नेहमीच येते, जिथे इतर लोक आठवतात तर तिथे तुमची आठवण का नाही येणार? आणि खरोखर आठवण येतही असते, येत नाही असे नाही.

आमची लाईफ आदर्श आहे, हीराबाही म्हणतात, 'तुम्ही लवकर या.' स्त्रीचा पती झालो केव्हा समजावे तर जेव्हा स्त्री पतीसाठी निरंतर पूज्यभाव अनुभवत असेल तेव्हा! पती तर कसा असावा? कधीही स्त्रीला, मुलांना कुठलीही हरकत येऊ देणार नाही, असा असावा. आणि स्त्री कशी असावी? कधीही पतीला अडचणीत टाकणार नाही आणि त्याच्याच विचारात जगणारी.

## १७. पत्नीसोबत भांडण

दोघेजण तुफान-मस्ती करत असतील, ते लढतील-भांडतील पण आत (मनात) दावा नाही मांडणार. आणि आपण जर मध्ये पडलो तर ते आपल्याकडून स्वत:चे काम करवून घेतील आणि ते दोघे पुन्हा एकच होतील. दुसऱ्या घरी रहायला नाही जात याला पोपटमस्ती म्हणतात, आम्ही लगेच समजून जातो ह्या दोघांनी पोपटमस्ती सुरु केली आहे.

एक तास नोकराला, मुलांना किंवा बायकोला खूप धमकावले असेल तर मग ते पुढच्या जन्मी पती बनून किंवा सासू होऊन तुम्हाला आयुष्यभर पायाखाली तुडवतील! न्याय तर असायला हवा की नाही? हेच भोगायचे आहे. तुम्ही कोणाला दु:ख द्याल तर आयुष्यभर तुम्हालाही दु:खच मिळेल. एकच तास जरी दु:ख दिले तरी त्याचे फळ आयुष्यभर भोगावे लागेल. नंतर मग बोलाल की 'बायको माझ्याबरोबर अशी का

वागते ?' बायकोलाही असे वाटते की 'नवऱ्यासोबत माझे वर्तन असे का होते आहे ?' तिला पण दु:ख होते, पण काय करणार ? मग मी त्यांना विचारले की 'बायकोने तुम्हाला शोधून आणले होते की तुम्ही बायकोला शोधून आणले ?' तेव्हा तो म्हणतो की, 'मी शोधून आणले.' तर मग तिचा बिचारीचा काय दोष ? आणल्यानंतर वाईट निघाली, त्यात ती काय करणार, कुठे जाईल मग ?

**प्रश्नकर्ता :** अबोला घेऊन, गोष्ट टाळल्याने त्याचा निकाल होऊ शकतो ?

**दादाश्री :** नाही होऊ शकत ? आपल्याला जर ते समोर भेटले तर, आपण त्यांची विचारपूस करायची, तुम्ही 'कसे आहात ? कसे नाही ?' असे विचारायचे. समोरचा जर बोंबाबोम करत असेल तर आपण जरा शांत राहून समभावे निकाल करावा, कधी ना कधी त्याचा निकाल करावाच लागेल ना ? अबोला धरला म्हणून काय त्याचा निकाल लागला ? हा निकाल लागला नाही म्हणून तर अबोला धरुन ठेवला. अबोला म्हणजे ओझे. ज्याचा निवाडा झालेला नाही त्याचे ओझे. आपण तर लगेचच त्याला थांबवून म्हणावे, 'थांबा ना ! माझी काही चुक असेल तर मला सांगा. माझ्याकडून खूप चूका होतात. तुम्ही तर खूप हुशार-शिकलेले, म्हणून तुमच्याकडून चुक होणार नाही, पण मी तर कमी शिकलेलो आहे म्हणून माझ्याकडून खूप चूका होतात.' असे बोलाल तर ती खुश होऊन जाईल.

**प्रश्नकर्ता :** असे बोलल्यानंतरही नरम पडली नाही तर काय करावे ?

**दादाश्री :** नरम पडली नाही तर काय करावे ? आपण सांगून मोकळे व्हायचे आणखी काय उपाय ? कधी ना कधी एखाद्या दिवशी नरम पडेल. दमदाटीने नरम कराल तर त्याने काही नरम होणार नाही. आज नरम वाटेल, पण ती मनात नोंद ठेवेल आणि जेव्हा तुम्ही नरम व्हाल त्या दिवशी सर्व उकरुन काढेल. अर्थात् जगत वैरभाववाले आहेत. निसर्गाचा नियम असा आहे की, प्रत्येक जीव आतमध्ये वैर बांधतोच. आत वैरभावाचे परमाणु साठवून ठेवतात. म्हणून आपण त्या प्रकरणाचा पूर्णपणे निकाल लावावा.

**प्रश्नकर्ता :** तर मग काही बोलायचेच नाही?

**दादाश्री :** बोलायचे, जर बोलता येत असेल तर सम्यक् बोला, नाहीतर कुत्र्यासारखे भुंकत राहण्यात काय अर्थ आहे? म्हणून सम्यक् बोलावे.

**प्रश्नकर्ता :** सम्यक् म्हणजे कसे?

**दादाश्री :** अहोहो! तुम्ही या मुलाला का पाडले? त्याचे कारण काय? तेव्हा ती सांगेल की, मी जाणून-बुझून पाडले का? तो तर माझ्या हातातून निसटला आणि पडला.

**प्रश्नकर्ता :** हे तर ती खोटे बोलते ना?

**दादाश्री :** ती खोटे बोलते हे आपल्याला पहायचे नाही. खोटे बोलेल की खरे बोलेल ते तिच्या आधीन आहे. ते आपल्या आधीन नाही.

**प्रश्नकर्ता :** बोलता येत नसेल तर मग काय करावे, गप्प बसावे ?

**दादाश्री :** मौन रहा आणि पाहत रहा की 'क्या होता है?' सिनेमात मुलाला फेकतात तेव्हा तुम्ही काय करता? बोलण्याचा अधिकार सर्वांना आहे. पण क्लेश वाढणार नाही अशाप्रकारे बोलण्याचा अधिकार आहे. ज्या बोलण्याने क्लेश वाढेल ते तर मूर्खांचे काम आहे.

**प्रश्नकर्ता :** आपल्याला भांडण करायचे नसेल, किंवा आपण कधी भांडतच नसू तरी सुद्धा घरातील सर्व समोरून रोजच भांडण करु लागले तर त्यावेळी काय करावे?

**दादाश्री :** आपल्याला भांडणप्रूफ व्हायला पाहिजे. भांडणप्रूफ झालात तरच या संसारात राहता येईल. आम्ही तुम्हाला भांडणप्रूफ बनवू. भांडण करणाराही कंटाळून जाईल असे आपले स्वरूप असायला हवे. 'वर्ल्ड' मध्ये कोणीही आपल्याला डिप्रेस करु शकणार नाही, असे व्हायला पाहिजे. आपण भांडण प्रूफ झाल्यावर काही भानगडच उरली नाही ना? लोकांना भांडण करायचे असेल, शिव्या द्यायच्या असतील तरी आपली काही हरकत नाही, आणि तरीही आपण निर्लज्ज नाही समजले जाणार, उलट आपली जागृति वाढेल.

पूर्वी जे भांडण केले होते त्याचे वैर बांधले गेले होते आणि ते आज भांडणाच्या रुपाने फेडले जात आहे. भांडण होते त्याच क्षणी वैरभावाचे बीज पडते. आणि ते पुढल्या जन्मी उगवते.

**प्रश्नकर्ता :** तर ते बीज कशाप्रकारे दूर होतील.

**दादाश्री :** हळू हळू समभावाने निकाल करत रहाल तर दूर होतील. खूप भारी बीज पडले असतील तर वेळ लागेल, शांती ठेवावी लागेल. प्रतिक्रमण खूप करावे लागतील. आपले कोणी काही घेत नाही, दोन टाईमचे जेवण मिळते. कपडे मिळतात, मग आणखी काय हवे? घराला कुलूप लावून जातात, पण आपल्याला दोन वेळचे जेवण मिळते, की नाही मिळत तेवढेच पहायचे आहे. आपल्याला आत बंद करुन गेले तरी हरकत नाही. आपण झोपून जावे. पूर्व जन्माचे वैर असे बांधले गेले आहेत की, आपल्याला कुलूप लावून आत कोंडून जातात! वैर, आणि तेही असमंजसपणे बांधले गेलेले! समंजसपणे असेल तर आपण समजू की हे समंजसपणे आहे, तर त्याचे निवारण होईल. पण आता असमंजसपणे असेल तर निवारण कसे होईल? अर्थात तिथे ती गोष्ट सोडून द्यावी.

आता सर्व वैरभाव सोडून द्यायचे. म्हणून कधीतरी आमच्याकडून 'स्वरूप ज्ञान' प्राप्त करुन द्या म्हणजे सर्व वैर सुटून जातील. ह्या जन्मातच सर्व वैर सोडून द्या. आम्ही तुम्हाला मार्ग दाखवू.

ढेकूण चावतात, ते तर बिचारे खूप चांगले आहेत. पण पति-पत्नीला चावायला धावतो आणि पत्नी पतीला चावायला धावते, ते तर खूप असह्य आहे. काय? चावता की नाही चावत?

**प्रश्नकर्ता :** चावतो.

**दादाश्री :** हे चावा घालणे बंद करायचे आहे. ढेकूण चावतात, पण ते चावून निघून जातात. ते बिचारे आतून तृप्त झाल्यावर निघून जातात. पण बायको तर सतत चावतच राहते. एक जण तर मला म्हणाला, माझी वाईफ तर मला सर्पिणी सारखी चावते! तर मुर्खा मग लग्न का केले त्या सर्पिणी बरोबर? मग काय तो स्वत: साप नसेल? मुर्खा?! अशीच का सर्पिण मिळेल? साप असेल तरच सर्पिण येईल ना?

आम्ही तर इतकेच जाणतो की, जर भांडणानंतर 'वाईफ' सोबत व्यवहारच ठेवायचा नसेल तर ती गोष्ट वेगळी आहे. पण पुन्हा बोलायचे असेल तर मग मधला सर्व व्यवहारच खोटा आहे. आमच्या हे ध्यानातच असते की, दोन तासानंतर पुन्हा बोलायचे आहे त्यानुळे आम्ही त्यात किटकिट करत नाही. तुमचा अभिप्राय पुन्हा बदलणार नसेल तर गोष्ट वेगळी आहे. तुमचा अभिप्राय बदलला नाही तर, तुम्ही केलेले खरे आहे. पुन्हा 'वाईफ' बरोबर रहायचे नसेल तर भांडण केले ते बरोबर आहे, परंतु हे तर उद्या पुन्हा एकत्र बसून जेवणार आहेत. मग काल जे नाटक केले त्याचे काय? याचा विचार करावा लागेल ना?

सर्व प्रथम पतीने बायकोची माफी मागतली पाहिजे कारण पती मोठ्या मनाचे असतात. बायको आधी माफी मागत नाही.

**प्रश्नकर्ता :** पतींना मोठ्या, उदार मनाचे म्हटले म्हणून ते खुश झाले.

**दादाश्री :** नाही, हे तर मोठ्या मनाचेच असतात. त्यांचे मन विशाल असते आणि स्त्रिया साहजिक असतात, आणि साहजिक असतात म्हणून आतून उदय आल्या वर त्या माफी मागतील किंवा नाही पण मागणार. पण तुम्ही जर माफी मागितली तर त्या सुद्धा लगेच माफी मागतील. आणि तुम्ही पुरुष उदयकर्माच्या आधीन नाही राहत, तुम्ही तर जागृतीच्या आधीन राहता आणि ह्या उदय कर्माच्या आधीन राहणाऱ्या, म्हणून तर त्यांना सहज म्हणतात! स्त्रियांना सहज म्हणतात. तुमच्यात सहजता येत नाही. सहज झालात तर खूप सुखी व्हाल.

**प्रश्नकर्ता :** हा अहम् खोटा आहे, असे आपल्याला सांगितले जाते, आम्ही हे सर्व ऐकत असतो, संत महात्मा सुद्धा असे सांगतात, तरीही हा अहम् का जात नाही?

**दादाश्री :** अहम् केव्हा जाईल? तर तो अहम् खोटा आहे असे आपण जेव्हा स्विकारु तेव्हा जाईल. पत्नीसोबत भांडण होत असेल तर आपण समजून जावे की आपला अहम् खोटा आहे. म्हणजे आपण रोज त्याच अहम्ने आतून तिची खूप माफी मागत राहिल्यास, तो अहम् निघून जाईल. काही उपाय तर करावाच लागेल ना?

आम्ही तर हा साधा सरळ रस्ता दाखवून देतो. आणि हे भांडण-तंटे काही रोज-रोज होतात? जेव्हा आपल्या कर्माचा उदय असेल, तेव्हा होतात, तेवढ्यापुरते 'ऐडजस्ट' होउन जायचे. घरात वाईफसोबत भांडण झाले असेल, तर भांडण झाल्यानंतर वाईफला हॉटेलात नेऊन खाऊ-पिऊ घालून खुश करायचे. आता कुठलाही तंत नाही राहिला पाहिजे.

म्हणून हे ज्ञान असेल तर ही भानगडच उरणार नाही. ज्ञान असेल, तर आपण सकाळच्या पहरी (शुद्धात्माचे) दर्शनच करणार ना? वाईफच्या आतही भगवंताचे दर्शनच करावेच लागणार ना? वाईफच्या आतही 'दादा' दिसले तर कल्याण झाले. वाईफला पाहिल्यावर दादा दिसतील ना! तिच्यात शुद्धात्मा दिसतो ना! तर मग कल्याण झाले.

अर्थात जसे-तसे करुन, 'ऐड्जस्ट' करुन टाईम पसार काढावा, म्हणजे उधारी फेडली जाईल. कोणाचे पंचवीस वर्षाचे, कोणाचे पंधरा वर्षाचे, तर कोणाचे तीस वर्षाचे, इच्छा असो अथवा नसो तरीही देणे तर फेडावेच लागते. आवडत नसेल तरीही त्याच खोलीत एकत्र रहावे लागते. एकीकडे बिछाना, 'बाईसाहेबांचे' आणि दुसरीकडे 'भाऊसाहेबांचे'! तोंड फिरवून झोपले तरीही बाईसाहेबांना विचार तर भाऊसाहेबांचेच येतात ना! सुटकाच नाही! हा संसारच असा आहे. फक्त तुम्हालाच ते आवडत नाहीत असे नाही, तर त्यानांही तुम्ही आवडत नसता! अर्थात् ह्यात मजा घेण्यासारखी नाही.

'डोन्ट सी लॉज, प्लीज सेटल' (कायदा बघू नका, समाधान करा). समोरच्याला सेटलमेन्ट (समाधान)करायला सांगावे. 'तुम्ही असे करा, तसे करा.' असे बोलायला वेळच कुठे असतो? समोरच्याच्या शंभर चूका असतील तरी पण तुम्हाला तर आपलीच चुक आहे असे समजून पुढे चालत रहायचे. ह्या काळात 'लॉ' (कायदे) बघायचे असतात का? हे तर आता शेवटच्या पायरी वर पोहचले आहे!

**प्रश्नकर्ता :** कित्येकवेळा घरात जोरदार भांडण होऊन जाते, तेव्हा काय करावे?

**दादाश्री :** शहाणा माणूस असेल, तर लाखो रुपये दिले तरी भांडण

करणार नाही! आणि हा तर बिनपैशाचे भांडतो, मग त्याला अनाडी नाही तर दुसरे काय म्हणावे? भगवान महावीरांना आपले कर्म संपवण्यासाठी साठ मैल चालून अनाडी क्षेत्रात जावे लागत होते, आणि ह्या काळातले लोक तर किती पुण्यशाली आहेत की, घरच्याघरात अनाडी क्षेत्र आहे! कसे अहोभाग्य! कर्म संपवण्यासाठी हे तर अत्यंत लाभदायी आहे. पण सरळ राहिले तर...

घरात कोणी विचारले, सल्ला मागितला तरच उत्तर द्यावे. विचारल्याशिवाय सल्ला देत बसतो त्याला भगवंताने अहंकार म्हटले आहे. पतीने विचारले की, हे ग्लास कुठे ठेवायचे आहे? तेव्हा पत्नी उत्तर देते की, अमक्या जागी ठेवा. तेव्हा तुम्ही तिथे ठेऊन द्यावे. पण त्या ऐवजी तो म्हणतो, 'तुला अक्कल नाही, इथे कुठे ठेवायला सांगतेस?' तेव्हा पत्नी म्हणते की, 'अक्कल नाही म्हणून तर मी तुम्हाला असे सांगितले, आता तुमच्या अक्कलेनुसार ठेवा.' ह्याचा अंत कधी येणार? ही केवळ संयोगांची आदळ-आपट आहे? म्हणजे भवरे, खातांना, उठतांना आपटतच राहतात! मग टेचले, जातात सोलले जातात आणि रक्त निघू लागते!! पण ह्यात तर मानसिक रक्त निघते ना! ते रक्त निघत असेल तर ठीक, तिथे पट्टी बांधल्यावर थांबेल. परंतु ह्या मानसिक घावावर तर कुठलीच पट्टी नाही ना!

घरात कोणालाही, पत्नीला, लहान मुलीला, कोणत्याही जीवाला झिडकारुन मोक्षाला जाऊ शकत नाही. कोणाला जरा सुद्धा झिडकारले तर तो मोक्षचा मार्ग नाही.

**प्रश्नकर्ता :** तिरस्कार आणि झिडकारणे ह्या दोघात काय फरक?

**दादाश्री :** झिडकारने आणि तिरस्कारात तर, तिरस्काराची तर कदाचित माहितीही पडणार नाही. झिडकारण्यासमोर तिरस्कार ही तर एकदम माईल्ड (छोटी) वस्तू आहे. परंतु झिडकारणे हे तर अतिशय उग्र स्वरूप आहे. झिडकारल्यावर लगेचच रक्त निघेल असे आहे. ह्या देहाचे रक्त नाही निघणार, पण मनाचे रक्त निघेल, असे झिडकारणे ही भारी वस्तू आहे.

एक ताई आहेत, त्या मला सांगत, होत्या 'गेल्या जन्मात तुम्ही माझे वडील होता असे मला वाटते' ताई खूप चांगली, संस्कारी होती. मग मी त्या ताईनां म्हटले की, ह्या नवऱ्यासोबत कसे जुळवून घेतेस? तेव्हा ती म्हणाली, 'ते कधी काही बोलत नाही. काहीही बोलत नाही.' तेव्हा मी विचारले, 'कधीतरी, काहीतरी होत असेल ना?' तेव्हा म्हणाली, 'नाही, तसे अधून-मधून टोमणे मारतात.' हो, ह्यावरुन मी समजून गेलो. तेव्हा मी विचारले 'ते टोमणे मारतात तेव्हा तू काय करतेस? तेव्हा तू काठी घेऊन येतेस की नाही?' तेव्हा ती म्हणाली, 'नाही, मी त्यांना असे म्हणते की कर्माच्या उदयाने तुम्ही आणि मी एकत्र आलो. मी वेगळी, तुम्ही वेगळे. तर आता असे का वागता? कशासाठी टोमणे मारायचे? हे सर्व काय आहे? ह्यात कोणाचाही दोष नाही. हे सर्व कर्माच्या उदयाचे दोष आहेत. म्हणून टोमणे मारण्यापेक्षा आपण कर्म फेडून टाकूया ना! असले भांडण तर चांगले म्हणावे ना!' आतापर्यंत बऱ्याच बायका पाहिल्या पण इतकी समंजस ही एकच बाई पाहिली.

माझा मूळ स्वभाव क्षत्रिय, आमचे रक्त क्षत्रिय, त्यामुळे उपरी (मालक-वरिष्ठ)ला धमकावण्याची सवय आणि अंडर हेन्डला (हाताखालची माणसं, नोकर) सांभाळण्याची सवय. हे क्षत्रियांचे मूळ गुण, म्हणजे ही वाईफ आणि इतर सर्व अंडर हेन्ड आहेत म्हणून मला त्यांचे रक्षण करण्याची सवय होती. त्यांनी उलट-सुलट काहीही केले तरी रक्षण करण्याची सवय. नोकर असतील त्या सर्वांचे रक्षण करत होतो, त्यांची काही चुक झाली असेल तरी त्या बिचाऱ्यांना काहीही बोलत नव्हतो पण उपरी कोणी असेल तर त्याचे डोके फोडून टाकत होतो. आणि हे सर्व जगत तर अंडर हेन्डसोबत कटकट करते.

आपण लग्न करुन बायकोला घरी आणले आणि तिला सारखे ओरडत राहिलो, तर हे कसे आहे की गाईला खुंटीला बांधून, तिला मारणे. खुंटीला बांधून मार-मार केले तर काय होईल? इथून मारले तर त्याबाजूला जाईल बिचारी! ती एका खुंटीला बांघलेली कुठे जाणार?! ह्या समाजाची खुंट अशी जबरदस्त आहे की तिला पळून जाताही येणार नाही. खुंटीला बांधली आहे आणि तिला मारले तर खूप पाप लागेल. खुंटीला बांधलेली

नसेल तर हातातच येणार नाही ना! ती तर समाजामुळे दबून बसली आहे, नाहीतर केव्हाच पळून गेली असती. डायवोर्स घेतल्यानंतर मारुन तर पहा, काय होईल मग?

एक मिनिट सुद्धा भानगड होणार नाही त्याचे नांव पती. मित्रांसोबत जसे बिगडवू देत नाही त्याचप्रमाणे जपावे. मैत्री जपली नाही तर मैत्री तुटून जाते. मैत्री म्हणजे मैत्री. तिला अट सांगून द्यायची, 'की तू मैत्रीत आउट ऑफ मैत्री झालीस (मैत्री नाही निभावली) तर गुन्हा लागेल. एक होऊन मैत्री निभावायची!'

फ्रेंड (मित्रा)साठी इतके सिन्सियर राहता की, फ्रेंड दूर राहत असेल तरी तो बोलतो, माझा फ्रेंड तर असा. माझ्यासाठी वाईट विचार करणारच नाही. त्याचप्रमाणे पत्नीसाठीही वाईट विचार करु नये. फ्रेंडपेक्षा ती अधिक नाही का?

## १८. पत्नी परतफेड करते तोलून मापून

जर रात्री पत्नीसोबत तुमचे भांडण झाले असेल, तर त्याची तंत (पकड) तिला सकाळपर्यंत राहते, म्हणून सकाळी चहा देताना चहाचा कप असे जोरात आपटते. त्यावर तुम्ही समजून जा की हं.... तंत अजून आहे, शांत झाली नाही. असे आदळ-आपट करते त्याचे नांव तंत.

हे ती का करते, कशासाठी करते? तर ती तुम्हाला दाबू पहाते. आणि तू चिडलास की ती समजून जाते, चला आता नरम पडला. पण जर चिडला नाही तर ती जास्त करेल, इतकी कटकट करुन सुद्धा पती जर रागवत नसेल तर मग आत जाऊन दोन-चार भांडी आपटते. आपटण्याचे खणखण.... आवाज ऐकून पती चिडतो. तरीही जर तो चिडला नाही तर मुलाला चिमटा काढून रडवते, तेव्हा मात्र तो पप्पा चिडतो, 'तू मुलाच्या पाठी का लागली आहेस? तू मुलाला का मध्ये आणतेस?' असे तसे.... म्हणजे ती समजते की, हां, आता हा नरम पडला.

पुरुष घटना विसरुन जातात आणि स्त्रियांची नोंद तर संपूर्ण आयुष्य रहाते. पुरुष खूप भोळे असतात, मोठ्या मनाचे असतात. भद्रिक असतात,

म्हणून ते सर्व विसरुन जातात, स्त्रिया तर बोलूनही दाखवतात, 'की त्या दिवशी तुम्ही जे काही बोललात, ते माझ्या काळजाला लागले आहे.' अरे, वीस वर्षे झाली तरी त्याची नोंद ताजी!! मुलगा वीस वर्षांचा झाला, लग्नाचा झाला तरी ती गोष्ट साठवून ठेवतेस?! सर्व वस्तू सडतील पण, ह्यांची वस्तू सडणार नाही!

स्त्रीला असे काही दिले असेल तर ते ती काळजात जपून ठेवते. म्हणून देऊ नका. देण्यासारखी वस्तू नाही ही. सावध राहण्यासारखे आहे.

नेहमीच, स्त्रीला जेवढे तुम्ही सांगाल, त्याची जबाबदारी येते. कारण की ती जोपर्यंत तुमचे शरीर चांगले मजबूत आहे, तोपर्यंत ती सहन करेल आणि मनात काय म्हणेल? सांधे ढिले पडतील तेव्हा बरोबर दाखवून देईल. ह्या सर्वांचे सांधे ढिले झाले आहेत त्या सर्वांना बरोबर दाखवून दिले आहे. हे सर्व मी पाहिले सुद्धा आहे. म्हणून मी लोकांना सल्ला देतो की बायकोशी भांडण करु नका. बायकोसोबत वैर बांधू नका. नाहीतर मेल्या भारी पडेल.

भारतीय स्त्री जर आपल्या मूळ संस्कारात आली, तर ती देवी आहे, पण हे तर बाहेरचे संस्कार लागले आहेत, त्यामुळे ती आता भरकटली आहे. म्हणून शास्त्रकारांनी म्हटले आहे, 'रमा रमाडवी सहेल छे, विफरी तो महामुश्केल थई जाय' आणि आपले लोक तर ती भरकटेल असे वागतात. उलट तिला अजून डिवचून उकसवतात आणि जेव्हा ती उकसवली जाते तेव्हा वाघिणी सारखी होते. म्हणून आपल्याला स्वतःच्या मर्यादे बाहेर जायला नको, मर्यादा ठेवली पाहिजे. आणि आपण जर स्त्रीला डिवचत राहिलो तर ती बिचारी कुठे जाईल? म्हणून मग ती उग्र होते, आधी उग्र होते मग बेकाबू ! आणि ती जर बेकाबू झाली की तर मग झाले! अर्थात तिला डिवचू नका. लेट गो करा.

आणि जर का स्त्री बेकाबू झाली तर तुझी बुद्धी नाही चालणार, तुझी बुद्धी तिला बांधू शकणार नाही. म्हणून ती बेकाबू होणार नाही अशारीतीने तिच्याशी बोला. डोळ्यात भरपूर प्रेम ठेवा. कधी उलट-सुलट बोलली, तर स्त्री जाती आहे असे मानून लेट गो करा. अर्थात् एका डोळ्यात भरपूर प्रेम ठेवा आणि दुसऱ्या डोळ्यात जरा सक्ती ठेवा, अशाप्रकारे राहिले पाहिजे.

ज्यावेळी जे गरजेचे असेल तसे, म्हणजे दररोज फक्त सक्तीने वागले नाही पाहिजे, तर एका डोळ्यात सक्ती आणि दुसऱ्या डोळ्यात देवी प्रमाणे असे मानले पाहिजे, समजले ना?

**प्रश्नकर्ता :** एका डोळ्यात सक्ती आणि दुसऱ्या डोळ्यात देवी, हे दोन्ही ऐट ये टाईम (एकाच वेळी) कसे राहू शकते?

**दादाश्री :** पुरुषांना तर असे सर्व येते. मी तीस-पस्तीस वर्षाचा होतो. त्यावेळी मी जेव्हा घरी यायचो तेव्हा हीराबा एकटयाच नाही, तर आजूबाजूच्या सर्व स्त्रिया माझ्या एका डोळ्यात सक्ती आणि दुसऱ्या डोळ्यात पूज्यता पाहत असत. सर्व स्त्रिया डोक्यावर पदर घेऊन बसत आणि लगेच सर्तक होत असत. आणि हीराबा तर घरात प्रवेश करण्या आधीच धस्स होऊन जात असत. बुटांची चाहूल लागल्यावर घाबरुन जात, एका डोळ्यात सक्ती, आणि एका डोळ्यात नरमाई. ह्याशिवाय स्त्रीला सांभाळताच येणार नाही. म्हणून हीराबा सांगत असे ना, 'दादा कसे आहेत?'

**प्रश्नकर्ता :** तिखट भोवऱ्यासारखे.

**दादाश्री :** तिखट भोवऱ्यासारखे कायम राहत होतो. तसे त्यांना कधीही घाबरवत नव्हतो. घरात आलो... की चूप, सर्व बर्फासारखे थंडगार होऊन जात असे. बुटांची चाहूल लागली की लगेचच!

सक्ती कशासाठी तर त्यांना कुठे ठोकर लागू नये, म्हणून सख्ती ठेवा. त्यासाठी एका डोळ्यात सक्ती आणि एका डोळयात प्रेम ठेवावे.

**प्रश्नकर्ता :** म्हणून संस्कृत मध्ये म्हटले आहे, 'यत्र नार्यस्तु पुज्यंते रमंते तत्र देवता!'

**दादाश्री :** हो, बस! म्हणून मी जेव्हा असे बोलतो ना, तेव्हा सर्व लोकं म्हणतात की, दादा तुम्ही स्त्रियांची बाजू घेता. पक्षपाती आहात?

परंतु मी काय सांगतो की, स्त्रियांना पूजा, याचा अर्थ असा नाही की सकाळी उठून त्यांची आरती करावी, असे कराल तर ती तुमचे चांगलेच तेल काढेल. याचा अर्थ काय ? एका डोळ्यात प्रेम आणि एका डोळ्यात सक्ती ठेवा.

अर्थात् पूजा करु नका. तशी योग्यता नाही. म्हणून मनाने पूजा करा.

तुम्ही पत्नीला सांगा की 'तुला माझ्याबरोबर जितके भांडायचे आहे तितके भांड. मला तर दादांनी भांडायचे नाही असे सांगितले आहे. दादांनी मला आज्ञा केली आहे. हा मी बसलो आहे, तुला जे काही बोलायचे आहे ते बोल आता, असे तिला सांगावे.'

**प्रश्नकर्ता :** पण मग ती बोलणारच नाही ना.

**दादाश्री :** दादांचे नांव येताच चूप होऊन जाईल. दुसरे कुठले हत्यार वापरु नकोस. हेच हत्यार वापर.

एक ताई तर मला म्हणाल्या होत्या,'लग्न झाले तेव्हा हे खूप कडक होते.' मी विचारले, 'आता?!' तेव्हा म्हणाली, 'दादा, तुम्ही तर सर्व स्त्री चारित्र्य ओळखता, माझ्या कडून का बोलवून घेता!' त्यांना माझ्याकडून काही सुख हवे असेल, तेव्हा मी त्यांना सांगते की, 'बाईसाब बोला.' बाईसाब म्हणवून घेत होती. त्यात माझी काय चुक? आधी ते माझ्याकडून भाईसाब म्हणवून घेत होते तर आता मी त्यांच्याकडून बाईसाब म्हणवून घेते. समजले?

हे अमलदार ही ऑफिसातून त्रासून घरी आले ना, तेव्हा बाई साहेब काय म्हणतात की 'दिढ तास उशीर झाला? कुठे गेलेलात?' घ्या!! एकदा त्याची बायको त्याला खडसावत होती, असा सिंहासारखा माणूस, ज्याला सर्व गुजरात घाबरतो त्याला ही घाबरवत होती, पहा ना! पूर्ण गुजरातमध्ये ज्याला कोणी एक शब्दही बोलू शकत नाही त्याला त्याची बायको ऐकतच नव्हती, उलट त्याला खडसावत होती! मग एके दिवशी मी, तिला म्हणालो, 'ताई' तुझा पती आहे तो जर तुला एकटीला सोडून दहा-पंधरा दिवस बाहेरगावी गेला तर? तेव्हा म्हणाली, 'मला तर भीती वाटेल.' कशाची भीती वाटते? तेव्हा म्हणू लागली, 'आत दुसऱ्या खोलीत पेल्यांचा जरी खडखडाट झाला तरीही मला वाटते की भूत आले असेल!' एखाद्या उंदराने देखील प्याला खडखडावला तरी मला भीती वाटते. आणि असा हा धनी! ज्या धनीमुळे तुला भीती नाही वाटत, त्याच धनीला तू खडसावत राहते. वाघासारख्या धनीचे तेल काढतेस!

एक माणूस तीन हजारांची घोडी घेऊन आला होता. तसे तर रोज त्या घोडीवर बाप बसत असे. त्याचा मुलगा चोवीस वर्षाचा होता. एकदा मुलगा घोडीवर बसून तलावावर गेला. त्या घोडीची जरा छेडखानी केली! आता घोडी तीन हजारांची, तिची छेडखानी का करावी! तिची छेडखानी करु नये, तिला तिच्या चाली प्रमाणेच चालू द्यावे लागते. तर त्याने छेडखानी केल्यावर घोडी दोन पायावर एकदम उभी राहिली. घोडी उभी राहिल्यावर तो मुलगा खाली पडला! गाठोडा खाली पडला! तो घरी आल्यावर काय म्हणाला की, 'ह्या घोडीला विकून टाका. घोडी खराब आहे.' तुला बसता येत नाही आणि घोडीचे दोष काढतो?! बघा, हा मालक!! हे सर्व मालक!! मग मी म्हणालो, 'हो काय? ती घोडी खराब होती (तीन) हजारांची घोडी! मुर्खा, तुला बसता येत नाही, त्यात घोडीला कशाला बदनाम करतोस?' घोडीवर बसता तर आले पाहिजे की नाही? घोडीला बदनाम करतोस?

एकदा जर पतीने पत्नीचा प्रतिकार केला तर पतीचा काहीही प्रभाव राहत नाही. आपले घर चांगल्या रितीने चालत असेल, मुलं व्यवस्थित शिकत असतील, काहीच भानगड नसेल आणि तरीही तुम्ही विनाकारण चूका काढून तिचा विरोध केला तर ती तुमची अक्कल मापून घेणार की ह्या नवऱ्यात काही बरकत नाही.

तुम्हाला स्त्रियांबरोबर 'डीलिंग' (व्यवहार) करता येत नाही. तुम्हा व्यापाऱ्यांना जर ग्राहकांसोबत डीलिंग करता आले नाही तर ते तुमच्याकडे येणार नाहीत. म्हणून लोकं म्हणतात ना की 'सेल्समेन' चांगला ठेवा? चांगला, हुशार, देखणा सेल्समेन असेल तर लोकं जरा जास्त किंमत पण देऊन टाकतात. अशाप्रकारे तुम्हाला स्त्रियांबरोबर डीलिंग करता यायला हवी.

ह्या स्त्री जाती मुळेच तर सर्व जगाचे नूर आहे. नाहीतर घरांत बुवां पेक्षाही वाईट हाल झाले असते. स्त्री नसेल तर घरात सकाळी झाडू मारलेला नसेल! चहाचा काही ठिकाणा ही नसेल!! वाईफ आहे म्हणून तर ती तुम्हाला सांगते, तेव्हा मग तुम्ही सकाळी लवकर लवकर उठून आंघोळ करता, तिच्यामुळे तर सारी शोभा आहे. आणि आपल्यामुळे त्यांची शोभा आहे.

स्त्री म्हणजे सहज प्रकृती, पतीला पाच करोडचे नुकसान झाले असेल, तर तो पूर्ण दिवसभर चिंता करत राहतो. दुकानात काही नुकसान झाले असेल तर घरी येऊन काही खात-पीत नाही, पण पत्नी तर तो घरी आल्यावर म्हणेल, उठा आणि चहा घ्या, आता जास्त हाय-हाय करु नका. तुम्ही चहा घ्या आणि खा निवांतपणे. अर्धी पार्टनरशिप असूनही तिला चिंता का होत नाही? कारण तिची प्रकृति साहजिक आहे. म्हणून या सहज प्रकृतिसोबत रहाल, तर जगता येईल नाहीतर जगता येणार नाही. आणि जर दोन पुरुष एकत्र राहत असतील तर मरुन जातील समोरासमोर. अर्थात स्त्री तर सहज आहे, म्हणून तर घरात आनंद राहतो थोडाफार.

स्त्री तर दैवी शक्ति आहे पण हे जर का पुरुषांना समजले तर काम फत्ते होऊन जाईल. स्त्रीचा दोष नाही, तर आपल्या चुकीच्या समजूतीचा दोष आहे, स्त्रिया तर देवी आहेत, त्यांना देवी पदावरुन खाली उतरवू नका. देवी आहे असे बोला. उत्तर प्रेदशात कित्येक ठिकाणी तर 'या देवी' असे बोलतात. आजही बोलतात, 'शारदा देवी आल्या, सीतादेवी आल्या!' अमुक काही प्रदेशात नाही का म्हणत?

आणि जर चार पुरुष एकत्र राहत असतील, तर एक जेवण बनवतो, एक दुसरा काही करतो... त्या घरात काही बरकत नसते. एक पुरुष आणि एक स्त्री राहत असतील, तर ते घर सुंदर दिसते. स्त्री (घराची) सजावट खूप चांगली करते.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही फक्त स्त्रियांचाच पक्ष घेत जाऊ नका.

**दादाश्री :** स्त्रियांचा पक्ष घेत नाही. पुरुषांचाच पक्ष घेतो. स्त्रियांना तसे वाटते की आमचा पक्ष घेतात, पण तरफदारी पुरुषांचीच करतो. कारण फॅमिलीचे मालक तुम्ही आहात. शी इज नॉट ओनर ऑफ फॅमिली. यु आर ओनर. लोकं मुंबईत म्हणतात ना, 'की तुम्ही पुरुषांचा पक्ष का घेत नाहीत फक्त स्त्रियांचाच पक्ष का घेता?' मी म्हणालो, 'त्यांच्या पोटी महावीर जन्माला आले आहेत, तुमच्या पोटी कोण जन्माला आले? विनाकारण वाद करत राहता?'

**प्रश्नकर्ता :** तरीही, तुम्ही स्त्रियांचा खूप पक्ष घेता, असे आम्हाला वाटते.

**दादाश्री :** हो, हा जरा माझ्यावर आक्षेप आहे. सगळीकडेच असे होते. हा आक्षेप लोकांनी माझ्यावर लावला आहे. पण त्याच बरोबर मी पुरुषांनाही अशी समज देतो की जेणे करुन स्त्रिया नंतर पुरुषांना मान देतात. अशी तजवीज करतो. दिसण्यात मात्र असे दिसते की स्त्रियांचा पक्ष घेत आहोत पण आतून तर पुरुषांचा पक्ष घेत असतो. म्हणजे हे सर्व तजवीज कशी करावी ह्याचे मार्ग असले पाहिजे. दोघांना संतोष झाला पाहिजे.

माझे तर स्त्रियांसोबतही जमत होते, आणि पुरुषांसोबतही तितकेच जमत होते. पण वास्तवात आम्ही तर स्त्रियांच्याही पक्षात नव्हतो आणि पुरुषांच्याही पक्षात नव्हतो. संसार-गाडा दोघांनी मिळून चालवा. स्त्रिया तर हेल्पिंग (सहायक) आहेत. त्या जर नसतील तर तुमचे घर कसे चालेल?

## १९. पत्नीच्या तक्रारी

तू फिर्याद करशील तर तू फिर्यादी होशील. मी तर, जो फिर्याद करायला येतो त्यालाच गुन्हेगार मानतो. तुझ्यावर फिर्याद करण्याची वेळच का आली? फिर्यादी बहुतेक करुन गुन्हेगारच असतात. स्वतः गुन्हेगार आहात म्हणून तर फिर्याद करायला येता. तू फिर्याद करशील तर तू फिर्यादी ठरशील आणि समोरचा आरोपी बनेल. म्हणजे त्याच्या दृष्टीने तू आरोपी ठरशील म्हणून कोणाच्याही विरुद्ध फिर्याद करु नका.

एकजण जर भागाकार करत असेल तर दुसऱ्याने गुणाकार करावा म्हणजे रक्कम शून्य होईल. समोरच्यासाठी असा विचार करावा की त्याने मला असे म्हटले, तसे म्हटले, हाच गुन्हा आहे. भिंतीशी आपटल्यावर तिच्यावर का नाही ओरडत? रस्त्याने चालताना जर झाडाला आपटलात तर त्याच्यावर का नाही ओरडत? झाडाला जड कसे म्हणाल? जे इजा करतात ती सर्व हिरवी झाडेच आहेत ना? असे ह्या सर्व लोकांचे आहे. 'ज्ञानी पुरुष' कसे सर्वांना माफ करतात? त्यांना माहित आहे की हे समजत नाहीत बिचारे, झाडासारखे आहेत ना! समजूतदाराला तर बोलावेच लागत नाही ना, ते तर आत लगेचच प्रतिक्रमण करुन घेतात.

पतीने अपमान केला तर मग काय करता? दावा मांडता?

**प्रश्नकर्ता :** असे कसे करणार? असे कोणी करत असेल?

**दादाश्री :** तर मग काय करता? माझा आशिर्वाद आहे, असे बोलून झोपी जा! काय ताई, तू झोपणार ना की मनात शिव्या देत राहणार? मनातल्या मनातच शिव्या देत राहते.

आणि तिने (बाजारात) तीन हजारांची साडी पाहिली असेल तर घरी येऊन तोंड फुगवून बसते. असे पाहिल्यावर आपण विचारले, 'काय झाले?' तर त्या साडीत हरवलेल्या असतात. जेव्हा आणून द्याल, तेव्हा (रुसवा) सोडतील, नाहीतर तोपर्यंत कटकट करणे सोडणार नाही. असे झाले नाही पाहिजे.

पत्नी म्हणेल की ह्या आपल्या सोफ्याची डिझाईन चांगली नाही. 'त्या तुमच्या मित्राकडे गेलो होतो, तिथे किती छान डिझाईन होती!' अरे, या सोफ्यात तुला सुख नाही मिळत? तेव्हा म्हणेल की, 'नाही, मी तिथे जे पाहिले त्यात सुख मिळेल.' मग पतीला तसाच सोफा आणावा लागतो! आता नवीन आणल्यावर जर कधी मुलाने ब्लेडने चीर मारली तर जणू आतून आत्मा कापला जातो! मुलं सोफ्याला चीर मारतील की नाही? आणि त्याच्यावर (सोफ्यावर) उड्या मारतील की नाही? आणि जेव्हा उड्या मारतील तेव्हा असे वाटते जणू काही छातीवर उड्या मारत आहेत असे वाटते! म्हणजे हा मोह आहे. हा मोहच तुम्हाला चावून चावून तुमचे तेल काढून टाकेल!

ह्यात तर विनाकारण जन्म बिघडून जाईल, आणि दुसरे म्हणजे ह्या बायकांना असे सांगू इच्छितो की, 'शॉपिंग करु नका.' शॉपिंग बंद करा. हे तर डॉलर आले म्हणून... अरे, जरुरत नाही तर का घेता. युझलेस. काही चांगल्या कामासाठी पैसे वापरले पाहिजे की नाही? कोणाच्या फॅमिलीत अडचण आली असेल, आणि त्या बिचाऱ्यांकडे (पैसे) नसतील, त्यांना जर पन्नास-शंभर डॉलर दिले तर किती बरे वाटेल! शॉपिंगमध्ये वायफळ खर्च करता आणि घरात ते सर्व सामान असेच पडून राहते.

**प्रश्नकर्ता :** मग स्त्रिया त्रागा (मनमानी) करतात!

**दादाश्री :** त्रागा तर स्त्रिया नाही, पुरुषही करतात.

आता तर जास्त त्रागा नाही करत. त्रागा म्हणजे काय? स्वत:ला काही हवे असेल तर समोरच्याला धमकावून उपभोगुन घेतात. स्वत:चे खरे करतात, मनमानी करतात!

**प्रश्नकर्ता :** सगळीकडे बायकांचाच दोष का पाहिला जातो आणि पुरुषांचा का नाही पाहिला जात.

**दादाश्री :** स्त्रियांचे तर असे आहे की, पुरुषांच्या हातात कायदा होता, म्हणून स्त्रियांचे नुकसान झाले आहे.

हे सर्व पुस्तक तर पुरुषांनी लिहिले आहे, म्हणून पुरुषांनाच पुढे ठेवले आहे, स्त्रियांना हटवून दिले आहे. त्यात तर ह्या लोकांनी स्त्रियांची वेल्यूच नाहीशी केली आहे. आता मार पण तितकाच खात आहेत, नरकात ही तेच जातात, इथूनच नरकात जातात. स्त्रियांमध्ये असे नाही. भले स्त्रीची प्रकृती वेगळी आहे पण तिच्या प्रकृती प्रमाणे तसेही फळ मिळते आणि हे सुद्धा फळ मिळते, स्त्रीची अजागृत प्रकृती आहे. अजागृत म्हणजे सहज प्रकृती.

**प्रश्नकर्ता :** कुठपर्यंत आम्ही असे सहन करावे?

**दादाश्री :** सहन केल्यामुळे तर खूप शक्ति वाढते.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे असे सहनच करत रहायचे?

**दादाश्री :** सहन करण्यापेक्षा त्यावर विचार करणे चांगले. विचार करुन त्याचे सोल्युशन (उपाय) काढा. बाकी सहन करणे हा गुन्हा आहे. सहनशीलता खूप झाली की मग स्प्रिंगसारखी उसळेल आणि सर्व घर सैरा-वैरा करुन सोडते. सहनशीलता तर स्प्रिंग आहे. स्प्रिंगवर कधीही लोड (दबाव) ठेवू नये. थोड्यावेळा पुरते ठिक आहे. रस्त्याने जाता-येता जर कोणासोबत काही झाले तर तेव्हा ही स्प्रिंग वापरावी. इथे घरातल्या लोकांवर लोड ठेवायचा नाही. घरच्या माणसांचे सहन केले तर काय होईल. तर ती स्प्रिंग उडेल.

**प्रश्नकर्ता :** सहनशीलतेची लिमिट किती ठेवावी?

**दादाश्री :** त्याला एका हद्दीपर्यंत सहन करावे. नंतर विचार करुन तपास करावा की वास्तविक आहे तरी काय. विचार कराल तर कळेल की ह्याच्या मागे काय कारण आहे! फक्त सहन कराल तर स्प्रिंग उडेल. विचार करण्याची गरज आहे. अविचारामुळे सहन करावे लागत आहे. विचार केल्यावर समजेल की ह्यात कुठे चुकते आहे! त्यामुळे त्याचे समाधान होईल. आत अनंत शक्ति आहे. अनंत शक्ति. तुम्ही मागाल ती शक्ति मिळेल असे आहे. हे तर आत शक्ति शोधत नाहीत आणि बाहेर शक्ति शोधतात. बाहेर कोणती शक्ति आहे?

सहन केल्यामुळेच घरात विस्फोट होतात. मनात असेच मानतात की मी किती सहन करु. बाकी, विचार करुन रस्ता काढला पाहिजे. जे संजोग मिळाले आहेत, जे संजोग निसर्ग निर्मित आहेत ह्यातून आता तू कसा निसटशील? नवीन वैर बांधायचे नसतील आणि जुने वैर सोडायचे असतील तर, त्यासाठी मार्ग काढला पाहिजे. हा अवतार वैर सोडण्यासाठी आहे. आणि वैर सोडण्याचा मार्ग आहे, प्रत्येकासोबत समभावे निकाल! मग पहा तुमची मुले किती संस्कारी होतील!

**प्रश्नकर्ता :** माझ्या मैत्रिणीचा असा प्रश्न आहे की, तिचा नवरा दररोज तिच्यावर रागावतो, तर त्याचे काय कारण असेल?

**दादाश्री :** ते तर चांगले आहे, लोकं आपल्याला रागावतील त्यापेक्षा पती रागवेल ते चांगले आहे, घरचा माणूस आहे ना!

असे आहे, ह्या लोहाराकडे, जाड लोखंड असेल ते जर त्याला वाकवायचे असेल त्यावेळी त्याला गरम करतात. का गरम करतात? थंड वाकू शकत नाही म्हणून लोखंडाला गरम करुन नंतर वाकवतात. नंतर मग दोन हातोडे मारले की लगेच वाकते. आपल्याला जसे हवे असेल तसे बनते. नेहमी प्रत्येक वस्तू गरम झाल्यावरच वाकते. जितकी गरम तितकी कमजोर आणि कमजोर म्हणजे मग एक-दोन हातोडी मारून आपल्याला हवी तशी डिझाईन करुन घ्यायची त्या पतीची.

**प्रश्नकर्ता :** कशी डिझाईन केली पाहिजे, दादा? हातात आल्यानंतर करावे?

**दादाश्री :** तुम्हाला जशी हवी तशी डिझाईन बनवून टाकतात. आपल्या नवऱ्याला पोपटासारखा बनवतात. पत्नी म्हणेल, 'आया राम' तेव्हा तो पण बोलेल, 'आया राम.' 'गया राम' तेव्हा तो पण बोलेल, 'गया राम'. असा पोपटासारखा बनून जाईल, परंतु लोकांना हातोडी मारता देखील येत नाही ना! ही सर्व कमजोरी आहे, राग येणे ही सर्व निर्बळता आहे.

तुम्ही रस्ताने जात असाल तेव्हा ह्या घरावरुन एक दगड तुमच्या डोक्यावर पडला, आणि रक्त निघू लागले, तर त्यावेळी काय खूप रागवाल?

**प्रश्नकर्ता :** नाही, हे तर 'हेपन' (घडून गेले) आहे.

**दादाश्री :** नाही, पण तिथे का रागवत नाही? म्हणजे तुम्ही तिथे कोणाला पाहिलेच नाही तर रागावणार कसे?

**प्रश्नकर्ता :** कोणी जाणून-बुजून मारला नव्हता.

**दादाश्री :** अर्थात् क्रोधावर आपले कंट्रोल आहे. जेव्हा आपल्याला हे माहित आहे की जाणून-बुजून कोणी मारलेले नाही. म्हणून तिथे कंट्रोल ठेऊ शकता. कंट्रोल तर आहेच. मग म्हणता, 'मला क्रोध येतो.' मुर्खा, मग तिथे का क्रोध येत नाही? पोलीसवाल्याबरोबर, पोलीसवाला धमकावतो त्यावेळी क्रोध का येत नाही? आणि पत्नीवर क्रोध होतो, मुलांवर क्रोध होतो, शेजाऱ्यांवर, नोकरावर वर क्रोध येतो नी 'बॉस' (साहेब) वर का नाही येत? क्रोध माणसाला येऊ शकत नाही. ही तर त्याला स्वतःची मनमानी करायची आहे.

**प्रश्नकर्ता :** घरात अथवा बाहेर फ्रेंड्समध्ये प्रत्येकांचे मत वेगवेगळे असते आणि तेथे जर आपल्या मनाप्रमाणे झाले नाही, तर मग आपल्याला क्रोध येतो? तेव्हा काय करायचे?

**दादाश्री :** सर्वजण स्वतःची मनमानी करायला लागले तर काय होईल? असा विचारच कसा येईल? लगेचच असा विचार यायला हवा की सर्व जर स्वतःची मनमानी करु लागले, तर इथे समोरासमोर भांडी तोडतील, आणि खायला देखील मिळणार नाही. म्हणून स्वतःची मनमानी

कधी करु नये. स्वत:चे मतच ठेवू नये जर तुम्ही मतच ठेवले नाही तर तुमचे खोटे पडणारच नाही. ज्याला गरज असेल तो मत ठेवेल, असे असायला हवे.

**प्रश्नकर्ता :** आपण हवे तितके शांत राहिलो, पण पुरुष रागावले तर आम्ही काय करावे?

**दादाश्री :** ते रागावतील आणि जर तुम्हालाही भांडण करायचे असेल तर तुम्ही देखील रागवा, अन्यथा तसे करणे बंद करा. फिल्म बंद करायची असेल तर शांत होऊन जा. फिल्म बंद करायची नसेल तर मग रात्रभर चालूच राहू द्या, कोण नको सांगतो तुम्हाला? आवडते खरी, फिल्म?

**प्रश्नकर्ता :** नाही, फिल्म नाही आवडत.

**दादाश्री :** रागवायचे कश्यासाठी? माणूस स्वत: रागवत नाही, हे तर मिकेनिकल एड्जस्टमेन्ट रागवत असते. स्वत: नाही रागवत. नंतर स्वत:ला मनात पश्चाताप होतो की रागवलो नसतो तर बरे झाले असते.

**प्रश्नकर्ता :** त्यांना थंड करण्याचा उपाय काय?

**दादाश्री :** हे तर मशीन गरम झाली असेल, आणि तिला थंड करायचे असेल तर थोड्यावेळेसाठी तशीच राहू द्या. म्हणजे मशीन आपोआप थंड होईल. हात लावाल, छेडखाणी कराल तर आपण भाजून मरु.

**प्रश्नकर्ता :** आम्हा पति-पत्नीमध्ये रागवणे आणि चढाओढ होत असते, वादविवाद वगैरे सर्व पण होऊन जातात, तर मी काय करु?

**दादाश्री :** तू रागवतेस की तो? कोण रागवतो?

**प्रश्नकर्ता :** पण मग माझ्याने पण होऊन जाते.

**दादाश्री :** तेव्हा आपण स्वत:च स्वत:ला आत ओरडायचे, का तू असे करतेस? जे (कर्म) केले ते भोगावे तर लागेलच ना! पण हे प्रतिक्रमण (पश्चाताप) केले तर सर्व दोष संपून जातील. नाहीतर आपण दुसऱ्यांना

दिलेले दु:ख आपल्यालाच भोगावे लागेल. पण त्यांतर प्रतिक्रमण केल्याने जरा शांत होईल.

**प्रश्नकर्ता :** परंतु पति-पत्नीमध्ये जरा रुसणे-रागवणे तर झालेच पाहिजे ना?

**दादाश्री :** नाही, असा काही कायदा नाही. पति-पत्नीमध्ये तर खूप शांती राहिली पाहिजे. दु:ख होत असेल, तर ते पति-पत्नीच नाहीत. फ्रेंडशिपमध्ये तसे होत नाही, खऱ्या फ्रेंडशिपमध्ये नाही होत. मग ही तर सर्वात मोठी फ्रेंडशिप आहे! इथे असे व्हायला नको, हे तर लोकांनी असे बसवले आहे. स्वत:ला राग येत असतो म्हणून तर लोकांनी मारून-मुटकुन असे बसवले, की नियमच असा आहे. पति-पत्नीमध्ये तर असे अजिबात झाले नाही पाहिजे. बाकी इतरत्र भले हो.

**प्रश्नकर्ता :** आपल्या शास्त्रात लिहिले आहे, की स्त्रियांनी पतीलाच परमेश्वर मानावे आणि त्यांच्या आज्ञानुसार चालावे. तर आता ह्या काळात ह्याचे पालन कसे करावे?

**दादाश्री :** हे तर पती जर रामासारखा असेल तर आपण सीता झाले पाहिजे. पती जर वाकडे वागत असेल आणि तुम्ही वाकडे न वागून कसे होणार? सरळ राहिलात तर उत्तम, पण सरळ रहावत नाही ना! माणूस सरळ कसा राहू शकेल, सतत हैराण करत राहिल मग! मग पत्नी काय करणार बिचारी? अर्थात पतीने पतीधर्म पाळला पाहिजे आणि पत्नी ने पत्नीधर्म पाळला पाहिजे. कदाचित पतीच्या थोड्याफार चूका होत असल्या तरी निभावून घेईल, तिला पत्नी म्हणावे. पण हा तर घरी येऊन शिवीगाळ करु लागला तर ही पत्नी बिचारी काय करणार?

**प्रश्नकर्ता :** पती हेच परमेश्वर हे काय खोटे आहे?

**दादाश्री :** आजच्या पतींना परमेश्वर मानले तर ते वेडे होऊन फिरतील असे आहेत!

**प्रश्नकर्ता :** पतीला परमेश्वर म्हणावे? त्याचे दररोज दर्शन करावे? त्यांचे चरणामृत प्यावे?

**दादाश्री :** ती त्यांना परमेश्वर म्हणेल पण त्यांना मरण येणार नसेल तर ते परमेश्वर. मरण येणार असेल तर कसले परमेश्वर?! पती परमेश्वर कसे असणार?! ह्याकाळातील पती परमेश्वर असू शकतात का?

**प्रश्नकर्ता :** मी तर रोज नवऱ्याच्या पाया पडते.

**दादाश्री :** असे करुन फसवत असेल नवऱ्याला. असे पाया पडून नवऱ्याला फसवतात. पती म्हणजे पती आणि परमेश्वर म्हणजे परमेश्वर. हे पती तरी कुठे बोलतात की, 'मी परमेश्वर आहे!' 'मी तर पती (मालक, धनी) आहे.' एवढेच म्हणतात ना?

**प्रश्नकर्ता :** हो, 'मालक आहे' असेच बोलतो.

**दादाश्री :** हं.... असे तर गायीचे पण मालक आहेत, सगळ्यांचे मालक आहेत. फक्त आत्माच परमेश्वर आहे, शुद्धात्मा.

**प्रश्नकर्ता :** चरणामृत पिवू शकतो का?

**दादाश्री :** आजच्या ह्या, दुर्गंधी सुटलेल्या माणसांचे चरणामृत कसे पिऊ शकता? ह्या माणसांची दुर्गंधी येते, असे बसले असतील तरी दुर्गंधी येते. पूर्वीचे लोक सुगंधवाले होते, तेव्हाची गोष्ट निराळी होती. आता तर सर्व लोकांना दुर्गंध येतो. आपले डोके देखील दुखू लागते. जसे-तसे करुन दिखावा करायचा की आम्ही नवरा-बायको आहोत.

**प्रश्नकर्ता :** आता तर सर्वांनी ते शब्द खोडून टाकले आहे, दादा. आता सर्व बायका शिकल्या-सवरल्या ना, म्हणून सर्वांनी हे परमेश्वर पद रद्द करुन टाकले आहे.

**दादाश्री :** पती परमेश्वर बनून बसले आहेत, बघा ना! ह्यांच्याच हातात पुस्तक लिहिण्याची सत्ता, म्हणून मग त्यांना कोण बोलणारा! एकपक्षी करुन टाकले ना? असे झाले नाही पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** पूर्वीच्या बायकांप्रमाणे, आजकालच्या बायका आपल्या नवऱ्याला मान देत नाहीत.

**दादाश्री :** हो, आधीचे पती 'राम' होते आणि आत्ताचे 'मरा' आहेत.

**प्रश्नकर्ता :** ह्या तर म्हणतात 'यमराज'.

**प्रश्नकर्ता :** पती प्रत्ये पत्नीचे कर्तव्य काय आहे, ते समजवून सांगा.

**दादाश्री :** स्त्रीने नेहमी पतीशी सिन्सियर (प्रमाणिक) राहिले पाहिजे. पतीने पत्नीला सांगितले पाहिजे की, जर 'तू सिन्सियर नाही राहिलीस तर माझे डोके फिरेल.' त्यांना तर चेतावणी दिली पाहिजे. 'बिवेर' (सावध) करा, पण आग्रह धरु नका की सिन्सियरच रहा. त्यांना बिवेर बोलू शकता. पूर्ण आयुष्यभर सिन्सियर रहायला हवे. रात्रंदिवस सिन्सियर, त्याचीच काळजी असायला हवी. तुम्ही त्यांची काळजी घ्यायला हवी, तरच संसार चांगला चालेल.

**प्रश्नकर्ता :** पतीदेव सिन्सियर राहिले नसल्यामुळे बायकोचे डोके फिरले. तेव्हा पाप तर लागत नाही ना?

**दादाश्री :** डोके फिरल्यावर स्वाद चाखतात ना! मग पती देखील स्वाद चाखतात ना! शक्यतो असे नाही केले पाहिजे. पतीची इच्छा नसेल तरी भूलचूक होत असेल तर त्यासाठी पतीने माफी मागितली पाहिजे की मी माफी मागतो. माझ्याकडून पुन्हा असे घडणार नाही माणसाने सिन्सियर तर राहिले पाहिजे ना? सिन्सियर नाही राहिलात तर कसे चालेल?

**प्रश्नकर्ता :** पती माफी मागतात, घडी घडी माफी मागतात, पण पुन्हा तसेच करत असतील तर?

**दादाश्री :** पती माफी मागतो तर नाही समजत की तो बिचारा किती लाचारी अनुभवतो आहे! म्हणून लेट गो करावे (सोडून द्यावे)! ही काही त्याला 'हेबिट' (सवय) नाही झाली आहे. 'हेबीच्युटेड'(आधीन) नाही झाला आहे. त्यांना देखील आवडत नाही, पण करणार काय? नाईलाजास्तव असे घडते. तेव्हाच तर भूलचूक होते ना!

**प्रश्नकर्ता :** पतीला तशी सवय झाली असेल, तर काय करावे?

**दादाश्री :** मग काय करावे? घराबाहेर करणार का त्यांना! घराबाहेर काढले तर बाहेर फजिती होणार. त्यापेक्षा झाकून ठेवले पाहिजे. दुसरे

करणार तरी काय? गटरला झाकतात की उघडे ठेवतात. ह्या गटारींवर झाकन ठेवतात की उघडे ठेवता?

**प्रश्नकर्ता :** बंद ठेवतो.

**दादाश्री :** नाहीतर मग उघडल्यावर दुर्गंध येईल, आणि आपले डोके दुखू लागेल.

**प्रश्नकर्ता :** हे कुंकू का लावतात? अमेरिकेतील बऱ्याच स्त्रिया आम्हाला विचारतात की तुम्ही कपाळावर कुंकू का लावता?

**दादाश्री :** हो, आम्ही आर्य स्त्रिया आहोत म्हणून कुंकू लावतो. आम्ही अनार्य नाही. आर्य स्त्रिया कुंकू लावतात. म्हणून तर नवऱ्याबरोबर हवे तेवढे भांडण झाले तरीही त्या घर सोडून जात नाहीत आणि कुंकू न लावणारी तर दुसऱ्याच दिवशी घर सोडून निघून जाईल. कुंकूवाली तर स्टेडी (ठाम) राहते. जिथे कुंकू लावतात त्या जागी मनाचे स्थान आहे, ते एका पतीमध्ये मन एकाग्र रहावे म्हणून.

**प्रश्नकर्ता :** पुरुषांचे तर तुम्ही सांगितले पण स्त्रियांनी काय करायला हवे? स्त्रियांनी दोन डोळ्यात काय ठेवावे?

**दादाश्री :** स्त्रियांनी तर, जर कसाही पती मिळाला असेल तरी तो आपल्या हिशोबाप्रमाणे मिळाला आहे. नवरा मिळणे ही काही थाप नाही. म्हणून जो पती मिळाला त्याच्याप्रती एक पतीव्रता राहण्याचा प्रयत्न करावा, आणि जर असे नाही होऊ शकले तर त्याची क्षमापना करा. अर्थात् तुझी दृष्टी अशी असायला हवी. आणि पतीसोबत पार्टनरशिपमध्ये कश्याप्रकारे प्रगती करता येईल, ऊर्ध्वगती होईल, कश्याप्रकारे मोक्ष प्राप्त होईल, असे विचार करावे.

## २०. परिणाम घटस्फोटाचे

मतभेद झालेले आवडतात? मतभेद असतील, तर भांडणे होतील, चिंता होईल, तर मग मनभेद ने काय होईल? मनभेद झाल्यावर 'घटस्फोट' घेतात आणि तनभेद झाल्यावर अर्थी निघते!

**प्रश्नकर्ता :** व्यावहारिक बाबतीत जे मतभेद होतात त्यांना विचारभेद म्हणतात की मतभेद म्हणतात?

**दादाश्री :** त्यांना मतभेद म्हणायचे. हे ज्ञान घेतले असेल तर त्यांना विचारभेद म्हणावे, नाहीतर मतभेद म्हणावे. मतभेदाने तर झटका लागतो!

**प्रश्नकर्ता :** मतभेद कमी असतील, तर ते चांगले नाही का?

**दादाश्री :** माणसांना मतभेद तर नसलेच पाहिजे. जर मतभेद असतील तर ती माणुसकीच म्हणता येणार नाही. कारण की मतभेदामुळे तर काहीवेळा मनभेद होऊन जातो. मतभेदातून मनभेद होतो म्हणून 'तू अशी आहेस, तू तुझ्या माहेरी निघून जा' असे जे होत असते त्यात मग मजा रहात नाही. अर्थात जसे-तसे करुन निभाऊन घ्यायचे.

**प्रश्नकर्ता :** आता तर थेट मतभेदापर्यंत पोहचले आहे.

**दादाश्री :** हेच तर सांगतो आहे ना, हे सर्व चांगले दिसत नाही. बाहेर शोभत नाही. त्यात काही अर्थ नाही. अजूनही सुधारता येईल असे आहे. आपण मनुष्य आहोत म्हणून सुधारता येईल. कशासाठी असे झाले पाहिजे? मूर्खांनो, फजिती का करुन घेता? काहीतरी समजावे तर लागेल ना? ह्या सर्वात सुपरफ्लुस (वरपांगी) रहायचे आहे, नाहीतर ह्या स्त्रीचे मालक होऊन बसले आहेत ही माणसे तर. अरे मेल्या, मालकीपणा कशाला बजावतो आहेस? हे तर इथे जगताय तोपर्यंत मालक आणि डायवोर्स घेत नाही तोपर्यंत मालक. उद्या बायकोने डायवोर्स घेतल्यावर तू कसला मालक?

**प्रश्नकर्ता :** आजकाल सगळेच डायवोर्स घेतात. घटस्फोट घेत आहेत, ते लहान-लहान मुलांना सोडून घटस्फोट घेतात, तर त्यांची हाय नाही लागत?

**दादाश्री :** लागते ना, पण ते काय करणार? वास्तविक घटस्फोट नाही घेतला पाहिजे. खरे तर सारे निभाऊन घेतले पाहिजे. मुलं होण्या आधी घटस्फोट घेतला असेल तर हरकत नाही, पण हे मुलं झाल्यावर घेतात, तर मुलांची हाय लागते ना!

**प्रश्नकर्ता :** मुलांच्या बापाचे डोके अजिबात चालत नसेल, काहीच कामकाज करत नसेल, मोटल चालवता येत नसेल, आणि घरात चार भिंतीच्या आत बसून रहात असेल, तर काय करावे?

**दादाश्री :** पण मग करायचे तरी काय?! दुसरा चांगला मिळेल की नाही याची काय खात्री?

**प्रश्नकर्ता :** ते तर नाहीच...

**दादाश्री :** दुसरा त्याहून खराब मिळाला, तर काय करशील? बऱ्याच स्त्रियांना असा मिळाला आहे. पहिला होता तो चांगला होता. अरे, सोडना झंझट, मग तिथेच पडून रहायचे होते ना! मनात हे सर्व समजायला नको का?

**प्रश्नकर्ता :** दादांवर सोपविले तर दूसरा चांगला मिळेल ना?

**दादाश्री :** चांगला मिळाला आणि तीन वर्षानंतर त्याला अटॅक आला, तर काय करशील? केवळ भीतीदायक ह्या संसारात कशासाठी हे सर्व....! जे घडले तेच करेक्ट असे मानून चालवून घेतले तर बरे. नाही का?

नेहमी, पहिला नवराच चांगला असतो, परंतु दुसरा तर भटक्याच असेल. कारण तो देखील अश्याच शोधात भटकत असतो. आणि तीही भटकत असते. तेव्हा दोघे एकत्र येतात ना! भटकणारे दोन ढोर एकत्र येतात. त्यापेक्षा तर पहिला होता तो चांगला! आपण त्याला जाणत तर असतो ना! तो रात्री गळा तर नाही दाबणार ना! असा तुम्हाला भरोसा तर असतो ना? आणि दुसरा तर गळा देखील दाबून देईल!

मुलांसाठी तरी स्वतःला समजले पाहिजे. एक किंवा दोन मुले असतील पण ती बिचारी निराधार होऊन जातील ना! निराधार नाही म्हटली जाणार?

**प्रश्नकर्ता :** निराधारच मानले जाणार ना!

**दादाश्री :** आई कुठे गेली? पप्पा कुठे गेले? एकदा स्वतःचा एक

पाय कापला गेला असेल, तर जन्मभर निभाऊन नाही घेत का, की मग आत्महत्या करता?

पती वाईट वाटत नाही! वाईट वाटेल तेव्हा काय करणार? मग जरी पतीचे डोके जरा वेडे-वाकडे असेल, तरी पण लग्न केले आहे म्हणून माझे पती, अर्थात् माझा पती सर्वात उत्तम-बेस्ट असे बोलावे. तात्पर्य या दुनियेत वाईट असे काही नाही.

**प्रश्नकर्ता :** बेस्ट, असे बोललो तर पती डोक्यावर चढून बसतील.

**दादाश्री :** नाही, ते डोक्यावर चढून बसणारच नाहीत. पूर्ण दिवसभर बाहेर काम करत असतात ते बिचारे काय चढून बसणार? आपल्याला जो पती मिळाला आहे त्यालाच निभाऊन घ्यावे, दुसरा पती थोडेच ना आणणार आहात? विकत मिळतात का? काही उलट-सुलट कराल, डायवोर्स (घटस्फोट) घ्यावा लागला, ते उलट खराब दिसेल. तो पण विचारेल की डायवोर्सवाली आहे? तेव्हा मग दुसरीकडे कुठे जाल?! त्यापेक्षा ज्या एका बरोबर लग्न केले आहे त्यालाच निभाऊन घ्या. सगळीकडे असेच असते. आपल्याला त्याच्याशी जमत नसते, पण काय करणार? आता जाणार कुठे? म्हणून त्याचा निकाल लावा.

आपले भारतीय किती नवरे बदलतात? हा एकच केला तोच...... जो मिळाला तो खरा. त्यालाच निभावून घ्या. आणि पुरुषांनी देखील जशी स्त्री मिळाली असेल तशी, कटकट करत असेल, तरी पण तिचा निवाडा करुन टाकलेले बरे. ती काही तुमच्या पोटात शिरुन चावणार आहे? ती तर बाहेर बोंबाबोंम करेल किंवा तोंडाने शिव्या देईल, पण पोटात शिरून चावली तर काय कराल तुम्ही? असे आहे हे सर्व. रेडियोच (बोलत) आहे. पण तुम्हाला समजत नाही की हे वास्तवात कोण करत आहे? तुम्हाला तर असेच वाटेल की हे सर्व तर खरोखर तीच बोलत आहे. मग तिलाही पश्चाताप होतो की अरेरे, मला असे बोलायचे नव्हते आणि तरीही बोलले गेले. तर मग ती करते की रेडियो करतो?

एकीचा संसार मुंबईत फ्रेक्चर होणार होता. पतीने दुसरा गुप्त संबंध ठेवला असेल आणि त्या बाईला ते माहित पडले, म्हणून जबरदस्त भांडण

होऊ लागले. मग त्या बाईने मला सांगितले की 'हे असे आहेत, मी काय करु? मला पळून जायचे आहे!' मी म्हणालो, एक पत्नीव्रताचा कायदा पाळत असेल असा भेटला तर पळून जा, नाहीतर दुसरा कोण चांगला मिळणार आहे? तसे तर पतीने एकच ठेवली आहे ना? तेव्हा म्हणाली, 'हो एकच आहे.' तेव्हा मी म्हाणालो, 'खूप चांगले. लेट गो कर (चालवून घे). मोठे मन कर. तुला ह्याहून चांगला दुसरा नाही मिळणार.'

कलियुगात तर पतीही चांगला मिळत नाही. आणि पत्नीही चांगली मिळत नाही. हा सर्व कचरा मालच आहे ना! माल पसंद करण्यासारखा नाहीच. म्हणून तुला ते पसंत करायचे नाही, तर तुला त्याचा निकाल लावायचा आहे. कर्माचा हा हिशोब फेडून टाकायचा आहे म्हणून या सर्वाचा निकाल लाव. तेव्हा लोकं तर खुशाल मालक-मालकीन बनायला मागतात. अरे मुर्खा, इथूनच निकाल लाव ना. कसेही करुन क्लेश कमी होईल, अश्याप्रकारे निकाल लावायचा आहे.

**प्रश्नकर्ता :** दादाजी, त्यांना असे संयोग मिळाले, तेही हिशोबानुसारच मिळाले असतील ना?

**दादाश्री :** हिशोबाशिवाय तर हे मिळणारच नाही ना!

संसार आहे तर घाव तर पडणारच ना? आणि बाईसाहेबही म्हणतील की आता हे घाव भरणार नाहीत पण संसारात मग्न झालो म्हणून हे घाव रुजले जातात. मूर्च्छितअवस्था आहे ना ही! मोहामुळे मूर्च्छितअवस्था आहे. मोहामुळेच घाव भरले जातात. घाव जर भरले नाही तर वैराग्यच येईल ना?! मोह कशाला म्हणतात? सर्व अनुभव घेतले असतील तरीही विसरून जातात. डायवोर्स घेताना नक्की करतात की आता कुठल्याही स्त्रीशी लग्न करायचे नाही, तरीही पुन्हा बस्तान मांडतात!

**प्रश्नकर्ता :** मी त्यांना सांगत होतो की आपल्या वैवाहिक जीवनात नव्याण्णव टक्के विजोड (असा जोडा जो एकमेकांना अनुरूप नाही) आहेत.

**दादाश्री :** कलियुगात ज्यांना विजोड म्हटले जाते ना ती जोडी एकतर उच्चगतिला जाते किंवा एकदम अधोगतित जाते. दोघांपैकी एक

कार्यकारी असतो. आणि सजोड (एकमेकांना अनुरुप जोडी) कार्यकारी नसतो. विजोड असेल तर उंच गतीत घेऊन जाईल. आणि सजोड तर भटकवतो एकत्र!

विजोडमध्ये कसे असले पाहिजे की ते बिघडतील तेव्हा आपण शांत राहिले पाहिजे, जर स्वतः समजूतदार असू तर. परंतु तेही बिघडतील आणि आपणही बिघडलो तर राहिले काय?

**प्रश्नकर्ता :** डिवोर्स, हे कोणत्या परिस्थितीत घेतले पाहिजे?

**दादाश्री :** जळो, हे डिवोर्स तर आता निघाले. पूर्वी डिवोर्स होतेच कुठे?

**प्रश्नकर्ता :** आता तर होत आहेत ना? तर ते कुठल्या परिस्थितीत करावे?

**दादाश्री :** कुठेही जुळत नसेल तर वेगळे झालेले बरे. एडजस्टेबल होणारच नसेल तर वेगळे झालेले बरे. नाहीतर आम्ही एकच गोष्ट सांगतो 'एडजस्ट ऐवरीव्हेर'. कारण की दुसऱ्यांना सांगून गुणाकार करायला जाऊ नका की, 'असा आहे नी तसा आहे.'

**प्रश्नकर्ता :** हे अमेरिकेतील लोकं डिवोर्स घेतात ते वाईट म्हणावे की, मग ज्यांचे एकमेकांसोबत जमत नाही म्हणून डिवोर्स घेतात ते चांगले म्हणावे?

**दादाश्री :** डिवोर्स घेण्याचा अर्थच काय आहे! ते काही कप-बशी आहेत का? कप-बशीला वेगळे करत नाही, त्यांचे डिवोर्स करत नाही, तर ह्या माणसांचे, स्त्रियांचे डिवोर्स कसे करता येईल?!

त्या अमेरिकन लोकांसाठी ठीक आहे, पण तुम्ही तर इंडियन आहात ना. जिथे एक पत्नीव्रत आणि एक पतीव्रतचे नियम होते. एका पत्नीशिवाय दुसऱ्या स्त्रीला पाहू नका असे म्हणत, असे विचार होते, तिथे डिवोर्सचे विचार शोभा देतात? डिवोर्स म्हणजे उष्टी भांडी बदलणे, जेवणानंतर उष्टे ताट दुसऱ्यांना देणे, नंतर तिसऱ्याला देणे, नुस्ती उष्टी भांडी बदलत राहणे, त्याचे नांव डिवोर्स, डिवोर्स तुला पसंत आहे?

कुत्रे, जनावर सर्व डिवोर्सवाले आहेत आणि हेच जर मनुष्य पण करू लागले तर मग दोघात फरक काय राहिला? माणूस बीस्ट (जनावर) सारखा झाला आहे. आपल्या हिंदुस्थानात तर एक लग्न केल्यानंतर दुसरे लग्न करत नव्हते. बायको मेली तरी पण दुसरे लग्न न करणारेही कित्येक होते. कसे पवित्र लोक जन्मले होते!

अरे, घटस्फोट घेणाऱ्यांना तर मी तासाभरात जुळवून देईल! ज्यांना घटस्फोट घ्यायचा असेल, त्यांना माझ्या जवळ घेऊन आलात तर मी एका तासात सर्व ठीक करून देईल. त्यानंतर ते दोघे एकत्रच राहतील. समज नसल्यामुळेच भीती वाटत असते. कित्येक वेगळे झालेल्या जोडप्यांना पुन्हा एकत्र आणले.

हे तर आपले संस्कार आहेत. दोघांना भांडता-भांडता ऐंशी वर्ष झाली, तरीही मेल्यानंतर तेराव्या दिवशी श्राद्ध करतात. श्राद्धात काकांना हे आवडत होते, ते आवडत होते, असे बोलून काकी सर्व काही मुंबईहून मागवून ठेवत होती. तेव्हा एक मुलगा, त्या ऐंशी वर्षाच्या काकींना म्हणाला, 'काकी, ह्या काकांनी तर सहा महिन्यांपूर्वी तुम्हाला पाडले होते. तेव्हा तर तुम्ही काकांबद्दल खूप उलट-सुलट बोलत होत्या.' त्यावर काकी म्हणाल्या 'तरी सुद्धा असा नवरा पुन्हा नाही मिळणार.' असे बोलली ती म्हातारी. संपूर्ण आयुष्याच्या अनुभवातून शोधून तिने काढले की ते मनाने खूप चांगले होते. प्रकृति जरा वाकडी होती, पण मनाने....

लोक पाहतच राहतील असे आर्दश आपले जीवन असायला हवे. आपण इंडियन आहोत. आपण काही अमेरिकन नाही. आपण आपल्या पत्नीला निभावून घ्यायचे आणि पत्नीने आपल्याला निभावून घ्यायचे, असे करता करता ऐंशी वर्ष होतात. आणि ती (फॉरेनवाली) एक तास सुद्धा निभावून घेणार नाही आणि तो सुद्धा एक तास निभावू शकणार नाही.

प्रत्येकाच्या आपापल्या प्रकृतीचे फटाके फुटत असतात. हे फटाकडे आले कुठून?

**प्रश्नकर्ता :** आपापल्या प्रकृतीचे आहेत.

**दादाश्री :** आणि जेव्हा आपल्याला वाटते की 'हा तर नक्कीच फुटणार, तेव्हा फूस होऊन जातो! फुर्रर... फूस होतो. नाही होत असे?'

आणि मन ओरडतो की 'किती जास्त बोललात, अती झाले हे.' तेव्हा मनाला सांगावे, 'झोप ना आता, हे घाव तर लगेच भरले जातील.' त्वरीत भरलेही जातात..... हो की नाही, खांद्याला थोपटवा म्हणजे झोपेल. तुझे घाव भरले गेले ना सर्व! नाही? जे घाव पडले होते ते?

**प्रश्नकर्ता :** भांडण होते तेव्हाही भरलेला मालच निघत असतो?

**दादाश्री :** तसे तर भांडण होते तेव्हा आत नवीन माल भरला जात असतो. पण हे आपले ज्ञान घेतल्यानंतर भरलेला माल खाली होतो.

**प्रश्नकर्ता :** नवरा जर माझ्याशी भांडत असेल आणि त्यावेळी मी प्रतिक्रमण केले तर?

**दादाश्री :** काही हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** तर तेव्हा सारा भरलेला माल खाली होऊन जाईल ना?

**दादाश्री :** तेव्हा तर सर्व निघून जाईल. जर प्रतीक्रमण होत असेल तर सर्व माल खाली होत जातो. प्रतीक्रमण हा एकच उपाय आहे या जगात.

पतीने ओरडले तर आता तू काय करशील?

**प्रश्नकर्ता :** समभावाने निकाल करायचा.

**दादाश्री :** असे होय! निघून तर जाणार नाही आता?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** आणि जर तो निघून गेला, तर मग तू काय करशील? 'माझे तुझ्याबरोबर जमणार नाही' असे तो बोलला तर?

**प्रश्नकर्ता :** परत बोलावून आणेल. माफी मागून, पाया पडून परत बोलावून आणेन.

**दादाश्री :** हो परत बोलावून आणायचे. समजावून-उमजावून

डोक्यावर हात ठेऊन, डोक्यावर हात फिरवून...... असे काहीतरी करावे की मग ते चूप होऊन जातील.

जर अक्कलेने काम होत असेल तर अक्कल वापरावी. मग दुसऱ्या दिवशी तो तुम्हाला म्हणेल, 'बघ, माझ्या पाया पडली होतीस ना?' तेव्हा तुम्ही बोला, ती गोष्ट वेगळी होती, त्या दिवशी तुम्ही पळून जात होतात, वेडेपणा करत होतात म्हणून पाया पडले! त्यांना असे वाटते की नेहमीसीठीच पाया पडेल, पण ते तर तात्पुरतेच होते. ऑन दि मोमेन्ट (तात्पुरते) होते!

## २१. सप्तपदीचे सार...

जीवन जगण्याची कलाच ह्या काळात उपलब्ध नाही, मोक्ष मार्ग तर जाऊ द्या पण जीवन जगता तरी आले पाहिजे ना? इतकेच समजायचे आहे की ह्या मार्गावर असे आहे आणि त्या मार्गावर असे आहे. आणि नंतर नक्की करायचे की कोणत्या मार्गाने जायचे? आणि समजत नसेल तर, 'दादा'नां विचाराचे, तर 'दादा' तुम्हाला दाखवतील की, हे तीन रस्ते जोखमीचे आहेत आणि हा रस्ता बिनजोखमिचा आहे. मग दाखवलेल्या रस्त्यावर आमचा आशीवार्द घेऊन चालायचे आहे.

विवाहीत लोकांना असे वाटते की आम्ही तर उलट, फसलो! अविवाहीतांना वाटते की ह्यांचे तर चांगले चालले आहे! ह्या दोघांमधील गैरसमज कोण दूर करणार? आणि लग्न केल्याशिवाय चालेल असेही नाही ह्या जगात! लग्न करून तरी दुःखी कशाला व्हायचे? तेव्हा सांगतात, ते दुःखी नाही होत पण, एक्सपिरियंस (अनुभव) घेत आहेत. संसार खरा आहे की खोटा आहे, सुख आहे की नाही?! हा हिशोब काढण्यासाठी संसार आहे. तुम्ही तुमच्या वही-खात्याचा थोडातरी हिशोब काढला आहे का?

संपूर्ण संसार तेलाच्या घाणी सारखा आहे. पुरुष बैलांच्या जागी आहेत तर स्त्रिया तेल काढणाऱ्याच्या तेलीच्या जागी आहेत. तिथे तेली गाणी गात असतो तर इथे स्त्रिया गात असतात! आणि बैल डोळ्यावर पट्टी बांधून स्वतःच्या धुंधीतच चालत असतात! गोल गोल फिरत राहतात. असेच ते दिवसभर बाहेर काम करतात आणि असे समजतात की आता आपण

काशीला पोहचलो असू!! आणि जेव्हा पट्टी खोलून पाहतात तर काय! भाऊसाहेब तिथल्या तिथेच असतात!! मग तेली त्या बैलाला काय करतो! थोडासा चारा खायला देतो म्हणजे बैल खुश होऊन पुन्हा गोल गोल फिरु लागतो. तसेच ह्या बायका चांगले जेवण खाऊ-पिऊ घालतात तर आपले भाऊ साहेब आरामात खाऊन-पिऊन पुन्हा सुरु!

आता जीवन जगणे कठीण झाले आहे. नवरा घरी येऊन म्हणेल की, 'माझ्या हार्टमध्ये दुखत आहे.' मुलगा येऊन बोलतो की, 'मी नापास झालो आहे.' नवऱ्याच्या छातीत दुखतय तर त्यावेळी तिला असा विचार येतो की, 'हार्ट फेल' झाले तर काय होईल. तऱ्हे तऱ्हेचे विचार फिरत राहतात. चैन पडत नाही.

लग्नाची किंमत केव्हा वाटेल? लाखो माणसात जेव्हा एकालाच लग्न करण्याची सवलत मिळाली असती तेव्हा. हे तर सर्वच लग्न करतात, त्यात काय विशेष? पति-पत्नीने (लग्नानंतर) व्यवहार कसे करावे, ह्याचे तर खूप मोठे कॉलेज आहे. हे तर न शिकताच लग्न करतात.

एकदा अपमान झाला, तर तो अपमान सहन करायला काही हरकत नाही. परंतु अपमान लक्षात ठेवण्याची गरज आहे की, काय अपमानासाठी आपले जीवन आहे. अपमानाची हरकत नाही, मानाचीही गरज नाही आणि अपमानाचीही गरज नाही. पण असे तर लक्षात असले पाहिजे ना की आपले जीवन काय अपमानासाठी आहे?

बीबी रुसली असेल तोपर्यंत 'या अल्लाह परवरदिगार' असे करतो आणि बीबी बोलायला लागली की भाऊ तैयार! मग अल्ला आणि बाकी सगळे राहिले बाजूला! किती गोंधण! अश्याने काही दुःख मिटणार आहेत?

संसार म्हणजे काय? जंजाळ (सापळा). हे शरीर मिळाले आहे, ते सुद्धा सापळा आहे! सापळे आवडतात का कधी? पण तेही आवडतात हेच किती अजब आहे ना! माश्यांचे जाळे वेगळे आणि हे जाळे वेगळे! माश्यांच्या जाळ्याला तर कापून सुद्धा सुटता येते, ह्या संसाररुपी जाळ्यातून मात्र सुटता येत नाही अर्थी निघाल्यावरच सुटका होते.

'ज्ञानी पुरुष' ह्या संसार जाळ्यातून बाहेर पडण्याचा रस्ता दाखवितात, मोक्षचा मार्ग दाखवितात आणि मोक्ष मार्गावर आणतात तेव्हा आपल्याला वाटते की ह्या उपाधीतून सुटलो!

याला जीवन कसे म्हणावे? जीवन कसे सुशोभित असते! एक-एक माणसाचे सुगंध यायला हवे. आजूबाजूला ज्याची अशी कीर्ती पसरलेली असेल तर तेव्हा म्हणावे लागेल की, 'हे जे सेठजी आहेत, ना, ते किती चांगले आहेत! त्यांचे बोलणे कीती सुंदर!! त्यांचे वर्तन किती सुंदर! सगळीकडे दिसते का अशी कीर्ती? लोकांचा असा सुगंध येतो?'

**प्रश्नकर्ता :** कधीकधी काही लोकांचे सुगंध येतात.

**दादाश्री :** काही काही माणसांचे, पण ते ही किती? आणि त्यात जर त्यांच्या घरी जाऊन विचारले तर त्याची दुर्गंधी कळते, बाहेर सुगंध येतो पण त्यांच्या घरी जाऊन विचारले ना तर घरचे म्हणतील, 'त्यांचे तर नांवच घेऊ नका, त्यांची गोष्टच करू नका.' अर्थात् याला सुगंध नाही म्हणत.

जीवन तर मदत (हेल्पिंग) करण्यासाठीच असले पाहिजे. ही अगरबत्ती जेव्हा जळते, तर त्यात ती स्वत:चा सुगंध स्वत: घेते का?

हा संसार जो आहे ते एक म्युजियम आहे. ह्या म्युजियममध्ये अट काय आहे? प्रवेश करताच लिहिले आहे की, भाऊ तुला जे काही खायचे-प्यायचे आहे, काही भोग भोगायचे आहे ते आतच भोग. येथून काहीही बाहेर घेऊन जायचे नाही आणि भांडायचे नाही. कोणा सोबतही राग-द्वेष करायचा नाही. खायचे-प्यायचे सर्व काही पण राग-द्वेष नाही. करायचे, आणि हे तर आत जाऊन लग्न करतात. अरे मुर्खा, लग्न का केलेस?! बाहेर निघताना संकटात सापडशील! तेव्हा मग म्हणशील, 'मी बांधलो गेलो.' तेर कायद्याप्रमाणे आत जाऊन खायचे-प्यायचे, बायको केली तरी हरकत नाही. बायकोला सांगून द्यावे की हे संग्रहस्थान आहे, यात राग-द्वेष नाही करायचे. जोपर्यंत अनुकूल आहे तोपर्यंत फिरायचे, पण शेवटी राग-द्वेष न करताना बाहेर निघून जायचे. त्यावर द्वेष सुद्धा नाही. उद्या जर ती दुसऱ्या कोणासोबत फिरत असेल तरी त्यावर द्वेष नाही! हे संग्रहस्थान असे आहे. मग आपल्याला जितक्या युक्त्या करायच्या

असतील तेवढ्या करा. आता संग्रहस्थान दूर करता येत नाही. तर जे झाले-घडले ते खरे. आपण संस्कारी देशात जन्मलो ना! म्हणून लग्न-बिग्न सर्व काही रितसरच.

## २२. पति-पत्नीचे प्राकृतिक पर्याय

**प्रश्नकर्ता :** स्त्रियांना आत्मज्ञान होऊ शकते की नाही? समकीत होऊ शकते?

**दादाश्री :** खरे तर नाही होऊ शकत. पण आम्ही इथे करवतो. कारण की स्त्रीच्या प्रकृतिचा स्तर असा आहे की आत्मज्ञान पोह्चू शकत नाही. कारण की स्त्रियांमध्ये कपटची ग्रंथी इतकी मोठी असते, मोह आणि कपट ह्या दोन्ही ग्रंथी आत्मज्ञानाला स्पर्श देखील करु देत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** अर्थात् हा तर 'व्यवस्थितशक्तिचा' अन्यायच झाला ना?

**दादाश्री :** नाही, ती तर पुढच्या जन्मी पुरुष होऊन मग मोक्षाला जाते. हे सर्व जे म्हणतात की स्त्रिया मोक्षाला जाऊ शकत नाही. तर ती काही एकांतिक गोष्ट नाही. पुरुष होऊन मग मोक्षाला जाते. असा काही कायदा नाही की स्त्रिया (पुढच्या जन्मी) स्त्रियाच राहणार. ती पुरुषासारखी केव्हा होईल तर जेव्हा ती पुरुषांबरोबर स्पर्धेत उतरली असेल, अहंकार वाढत असेल क्रोध वाढतच असेल, तेव्हा स्त्रीपणा निघून जाईल. अहंकार आणि क्रोधची प्रकृती पुरुषांची आणि माया आणि लोभची प्रकृती स्त्रियांची, अशाप्रकारे चालते ही गाडी. पण आमचे हे अक्रम विज्ञान असे आहे की, स्त्रियांचेही मोक्ष होऊ शकतो. कारण हे विज्ञान आत्मा जागृत करतो. आत्मज्ञान नाही होऊ शकले तरी काही हरकत नाही, पण आत्म्याला जागृत करतो. कित्येक स्त्रिया अशा आहेत की त्यांना चोवीस तास दादा निरंतर आठवतात! हिंदुस्थानात कित्येक असतील आणि अमेरिकेतही कित्येक असतील की ज्यांना दादा चोवीस तास निरंतर आठवतात!

**प्रश्नकर्ता :** अर्थात् आत्म्याला कुठलीही जातीच नाही ना?

**दादाश्री :** आत्म्याला जाती असतच नाही ना! प्रकृतीला जाती

असतात. पांढरा शुभ्र माल भरला असेल तर पांढरा शुभ्र निघेल. काळा भरला असेल तर काळा निघेल. प्रकृती देखील भरलेला मालच आहे. जो माल भरलेला आहे त्याचे नांव प्रकृती, आणि त्यालाच पुद्‌गल म्हणतात. पुद्‌गल म्हणजे जे पुरण केले त्याचे गलन होतच राहते. जेवणाचे पुरन केले, तर त्याचे संडासात गलन होते. पाणी पीले, तर त्याचे लघवीत, श्वासोश्वास हे सर्व पुद्‌गल परमाणु आहेत.

पुरुष व्हायचे असेल तर, मोह आणि कपट हे दोन गुण सुटले की काम होईल. मोह आणि कपट हे दोन प्रकाराचे परमाणु एकत्र आले की स्त्री बनते. आणि क्रोध आणि मान हे दोन परमाणु एकत्र आले की पुरुष बनतो. अर्थात् परमाणुच्या आधाराने हे सर्व घडत असते.

एकदा स्त्रियांनी मला विचारले की, आमच्यात काही विशेष प्रकारचे दोष असतात, त्यापैकी जास्त नुकसानकारक दोष कोणता? तेव्हा मी म्हणालो, स्वतःचे खरे (मनमानी) करवून घेता तो. सर्व स्त्रियांची इच्छा अशी असते की, आपल्या मर्जीनुसार करायची. पतीला देखील उलट मार्गावर नेऊन, त्यांच्याकडून स्वतःचे खरे करवून घेतात. हा खोटा, आणि उलटा मार्ग आहे. मी त्यांच्याकडून लिहून घेतले आहे की हा रस्ता नसावा. मनमानी करण्यात काय अर्थ आहे! खूप नुकसानकारक आहे!

**प्रश्नकर्ता :** ज्यात कुटुंबाचे भले होत असेल, असे आपण जर करवून घेतले तर ह्यात काय चुकीचे आहे?

**दादाश्री :** नाही, त्या भलं करुच शकत नाही ना! ज्या स्वतःच्या मर्जीनुसार करवून घेतात, त्या कधीही कुटुंबांचे भले करुच शकत नाही. कुटुंबाचे भले कोण करु शकते तर 'सगळ्यांच्या मर्जीनुसार झाले तर ते योग्य' असा विचार करेल तीच कुटुंबाचे भले करु शकते. एकाचेही मन दुखावणार नाही अशाप्रकारे झाले तर. ज्या मनमानी करायला जातात त्या तर कुटुंबाचे खूप नुकसान करतात. आणि हेच तर वादविवाद आणि भांडणाचे साधन आहे. परत स्वतःच्या मर्जीनुसार करता येत नाही म्हणून तर खात नाही, दुःखी होऊन मन मारून बसून राहते. कोणाला मारायला जाणार, मन मारून बसून राहते. पण मग दुसऱ्या दिवशी परत कपट करते.

हा कुठला प्रकार! मनमानी करायला जाते पण नाही करू शकली तर मग काय होईल? असे सगळे नाही केले पाहिजे. स्त्रियांनो, आता मोठ्या मनाच्या व्हा.

**प्रश्नकर्ता :** स्त्रिया स्वत:च्या अश्रूंनी पुरुषांना विरघळून टाकतात आणि स्वत:चे जे खोटे असले ते ही खरे करून घेतात, या बाबतीत आपले काय म्हणणे आहे.

**दादाश्री :** गोष्ट खरी आहे. ह्याचा गुन्हा त्यांना लागतो आणि असे खोटे आग्रह करतात ना त्यामुळे विश्वास तुटून जातो.

ज्यांचे पती भोळे आहेत त्यांनी बोट वर करा पाहू. ज्यांनी बोट वरती केले ना, त्या मला येऊन खाजगीत सांगतात, की आमचे 'पती भोळे आहेत, सर्वच भोळे आहेत.' हे इटसेल्फ सुचवतात की, ह्या स्त्रिया तर पतीना खेळण्या प्रमाणे नाचवतात. पण हे जर जाहीर केले तर खराब दिसेल. खराब नाही दिसणार?! जास्त बोलण्यासारखे नाही. खाजगीत स्त्रियांना विचारले की. 'ताई, तुमचे पती भोळे आहेत?' तर म्हणेल 'खूपच भोळे.' कपटचा माल भरलेला आहे त्यामुळे. परंतु असे बोलू नये, खराब दिसेल. त्यांच्यात इतर गुण खूप सुंदर आहेत.

**प्रश्नकर्ता :** स्त्रियांना एकीकडे लक्ष्मी बोलले जाते, आणि दुसऱ्या बाजूला कपटवाली, मोहवाली.....

**दादाश्री :** लक्ष्मी म्हणतात, तर काय ती अशी-तशी आहे? जर पतीला नारायण म्हटले जाते तर मग तिला काय म्हणाल? अर्थात् त्या जोडीला लक्ष्मी नारायणचा जोडा म्हणतात! तर मग स्त्री काही खालच्या दर्जाची आहे? स्त्री तर तीर्थंकरांची माता आहे. जेवढे चोवीस तीर्थंकर झाले, त्यांची माता कोण?

**प्रश्नकर्ता :** स्त्रिया.

**दादाश्री :** तेव्हा त्यांना खालच्या दर्जाची कसे बोलू शकता? स्त्री झाली अर्थात मोह तर असणारच पण जन्म कोणाला दिला, तर सर्व मोठ-मोठ्या तीर्थंकरांना जन्म दिला, सर्वच महान लोकांना जन्म तिनेच दिला आहे

तर आपण तिची निंदा, अवहेलना कशी करू शकतो? तरीही आपले लोक अवहेलना करतात.

**प्रश्नकर्ता :** आपण सदैव स्त्रीलाच मर्यादा ठेवण्यास सांगत असतो, पुरुषांना मात्र असे सांगत नाही.

**दादाश्री :** हा तर स्वतःच्या मनुष्यपणाचा दुरुपयोग केला आहे. सत्तेचा दुरुपयोग केला आहे. सत्तेचे दोन उपयोग होऊ शकतात. एक सदुपयोग होऊ शकतो आणि दुसरा दुरुपयोग. सदुपयोग केला तर सुख वर्तेल, परंतु अजूनही दुरुपयोग करता, म्हणून दुःखी आहे. जर सत्तेचा दुरुपयोग केला तर ती सत्ता हातातून निघून जाणार पण जर ती सत्ता तुम्हाला कायम ठेवायची असेल, जर नेहमी पुरुष बनूनच रहायचे असेल, तर सत्तेचा दुरुपयोग करु नका, नाहीतर सत्ताधीशांना, पुढल्या जन्मी स्त्री बनावे लागेल. सत्तेचा दुरुपयोग केला तर सत्ता निघून जाते.

काहीही होऊ देत, पती नसेल, पती (सोडून) निघून गेला असेल, तरी सुद्धा परपुरुषाकडे जाणार नाही. मग तो कसाही असेल, जरी साक्षात् देवसुद्धा पुरुष होऊन समोर आला असेल तरी नाही जाणार, 'माझा नवरा आहे, मी पतीव्रता आहे' तिला सती म्हणतात. आजच्या काळात सती म्हणण्या सारखे गुण आहेत का ह्यांच्यात? नाहीच आहे. आता काळ वेगळ्या तऱ्हेचा आहे ना! पण सत्युगात कधीतरी असा योग येत असतो सतींसाठीच म्हणून तर आजही आपले लोक सतींचे नांव स्मरण करतात!!

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** ते सती होण्याच्या इच्छेमुळे. त्यांचे (सतींचे) नांव घेतले तर केव्हातरी सती होईल आणि विषयविकार तर बांगड्यांच्या भावाने विकला जात आहे. हे तुम्हाला माहित आहे? तुम्हाला माझ्या बोलण्याचा अर्थ समजला की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो, बांगड्यांच्या भावाने विकला जात आहे.

**दादाश्री :** कुठल्या बाजारात? कॉलेजमध्ये! काय दरात विकला जातो? सोन्याचा भावाने बांगड्या विकल्या जातात. आधी हिऱ्याच्या भावाने

बांगड्या विकल्या जात होत्या! सगळीकडे असेच होत असते का? नाही होत, सर्वत्र असे नाही होत? कित्येक तर सोने दिले तरीही घेत नाहीत. काहीही द्या तरी नाही घेत! पण इतर स्त्रिया तर विकल्या जातात, आजच्या स्त्रिया. सोन्याच्या दराने नाही तर दुसऱ्या दराने विकल्या जातात!

अर्थात् ह्या विषयविकारामुळेच स्त्री झाली आहे. फक्त विषयविकारामुळेच आणि पुरुषांनी स्त्रियांना भोगण्यासाठी एनकरेज (उत्तेजीत) केले आणि बिचारीला बिगडवले. तिच्यात बरकत नसेल तरीही बरकत आहे असे स्वतः मानून घेते. तेव्हा विचारले, तिने असे का मानून घेतले? कश्या प्रकारे मानले? तर पुरुष तिला तसे सतत सांगत राहिले, त्यामुळे ती समजते की तो जे बोलत आहेत त्यात काय चुकीचे आहे. ती स्वतःहून तसे मानत नाही. पण तुम्ही म्हणालात की, तू खूप चांगली आहेस, तुझ्यासारखी तर दुसरी कोणी असूच शकत नाही. तुम्ही तिला म्हणालात की तू खूप सुंदर आहेस, तेव्हा मग ती स्वतःला सुंदर मानू लागते. ह्या पुरुषांनी स्त्रीला स्त्री रूपातच ठेवले आहे. आणि स्त्री मनात मानते की मी पुरुषाला मूर्ख बनवते. असे करुन पुरुष तिला भोगून मोकळा होतो.

**प्रश्नकर्ता :** याचा अर्थ असा की, स्त्रिया बऱ्याच जन्मात स्त्री म्हणूनच जन्म घेतील हे काही नक्की नाही. पण हे त्या स्त्रियांना माहित नाही म्हणून त्यावर उपाय होत नाहीत.

**दादाश्री :** उपाय केले तर स्त्री ही पुरुषच आहे. त्या ग्रंथीला ओळखतच नाही बिचारी आणि तिथे इंटरेस्ट येतो, मजा वाटते म्हणून त्यातच अडकून राहते आणि (हा) रस्ता कोणाला माहितच नाही म्हणून दाखवलाही जात नाही. ते केवळ सती स्त्रियांनाच माहित होते, (लग्नानंतर) लगेचच पती मृत्यु पावला, निघून गेला तरी सती स्त्रिया स्वतःच्या पती शिवाय अन्य कुठल्याही पुरुषाचा कधीही विचार सुद्धा करत नाहीत. त्याच पतीला पती मानतात. तर असे त्या स्त्रियांचे सर्व कपट विरघळून जाते.

सतीत्व असेल तर कपट आपोआपच निघून जाते. तुम्हाला काही बोलावे लागत नाही. ती मूळ सती तर जन्मापासूनच सती असते. म्हणजे

तिच्यावर पूर्वीचे काहीच डाग नसतात. आणि तुमच्यावर तर पूर्वीचे डाग राहिलेले असतात आणि परत तुम्ही पुरुष बनता. पण पुरुषातही, जे पुरुष झाले आहेत ते सर्व सारखेच नसतात. कित्येक पुरुष स्त्रियांसारखे असतात. म्हणजे त्यांच्यात थोडी स्त्रियांची लक्षणे राहून जातात, पण मग त्यांच्यातला कपट विरघडतो आणि त्यानंतर जर का त्यांच्यात सतीत्व सारखे गुण आले की मग कपट पूर्णपणे निघून जातो. पुरुष असेल तर सती प्रमाणे त्याचे सर्व दोष संपतात. सतीत्वमुळे सर्व दोष संपतात. जितक्या सती झाल्या, त्यांचे सर्व दोष संपतात आणि त्या मोक्षाला जातात. थोडेफार कळले का? मोक्षाला जाण्यासाठी सती व्हावे लागेल. हो, जितक्या सती झाल्या त्या मोक्षाला गेल्या, किंवा मग त्यांना पुरुष देह घ्यावे लागते. पुरुष भोळे असतात, जसे नाचवू तसे नाचतात बिचारे. सर्व पुरुषांना स्त्रियांनी नाचवले आहे. फक्त सती स्त्रियाच पुरुषांना नाचवत नाहीत. सती स्त्रिया तर पतीला परमेश्वर मानतात!

**प्रश्नकर्ता :** असे जीवन तर खूपच कमी लोकांचे पहायला मिळते.

**दादाश्री :** ह्या कलियुगात कुठून असणार? सत्युगातही क्वचित सती असतात, तर ह्या कलियुगात कुठून असणार?

अर्थात् ह्यात स्त्रियांचे दोष नाही, स्त्रिया तर देवीसारख्या आहेत! स्त्रियात आणि पुरुषात आत्मा तर आत्माच आहे, फक्त खोक्यांचा फरक आहे. 'डिफरन्स ऑफ पॅकिंग!' स्त्री ही एक प्रकारची 'इफेक्ट' (परिणाम) आहे. म्हणजे त्या आत्म्यावर स्त्रीपणाची 'इफेक्ट' रहाते. ती 'इफेक्ट' आपल्यावर नाही राहिली तर उत्तम. स्त्री तर शक्ति आहे. ह्या देशात राजनीतीमध्ये कसल्या कसल्या स्त्रिया होऊन गेल्या! आणि ह्या धर्मक्षेत्रात स्त्री आली तर ती कशी असेल?! ह्या क्षेत्रातून तर जगाचे कल्याणच करून टाकेल! स्त्रीमध्ये तर जगत कल्याणची शक्ति खूप भरलेली आहे! तिच्यात स्वत:चे कल्याण करुन इतरांचे कल्याण करण्याची शक्ति आहे!

## २३. विषयविकार बंद तिथे प्रेम संबंध

वैवाहिक आनंदमय जीवन केव्हा शोभुन दिसेल तर जेव्हा दोघांना ताप चढल्यावर औषध घेतील तेव्हा. तापाशिवाय औषध पिणार नाही. जर

एकाला ताप नसेल आणि औषध प्यायले तर वैवाहिक जीवन शोभुन दिसणार नाही. दोघांना ताप चढल्यावरच औषध घ्यावे. धिस इज द ओन्ली मेडिसिन (हे मात्र औषध आहे). औषध गोड आहे, म्हणून रोज रोज प्यायचे नसते. वैवाहिक जीवन उज्वल करायचे असेल तर, संयमी पुरुषाची गरज आहे. ह्या सर्व जनावरांना असंयमी म्हटले जाते. मनुष्य जीवन तर संयमी असायला हवे! पूर्वी जे राम-कृष्ण इत्यादी होऊन गेले, ते सर्व संयमी पुरुष होते. स्त्री सोबत संयमी! तर असंयम हा काय दैवीगुण आहे? हा तर पाशवी गुण आहे. मनुष्यात असे गुण नसतात. मनुष्य असंयमी नसवा. जगातल्या लोकांना समजतच नाही की विषयविकार काय आहे! एका विषयभोगात, एकाच वेळी पाच-पाच लाख जीव मरतात, पण ह्याची समज नसल्यामुळे त्यात मजा घेतात. समजच नाही ना! जेव्हा नाईलाजानेच अशी हिंसा होईल, असे असले पाहिजे. पण तशी समजच नसेल तर काय करणार?

सर्व धर्मांनी जटील समस्या निर्माण केली आहे की स्त्रियांचा त्याग करा. अरे, स्त्रीचा त्याग केला तर मी कुठे जाणार? मला जेवण कोण बनवून देणार? मी माझा व्यापार धंदा करु की घरी चूल पेटवु?

वैवाहिक जीवनाची तर प्रशंसा केली आहे. शास्त्रकारांनी वैवाहिक जीवनाची निंदा केलेली नाही. लग्नाशिवाय इतर जे भ्रष्टाचार होत आहेत त्याची निंदा केली आहे.

**प्रश्नकर्ता :** विषयभोग संतानप्राप्ती पुरतेच असायला हवे की, बर्थ कंट्रोल (कुटुंब नियोजन) करुन विषयभोग करु शकतो?

**दादाश्री :** नाही, नाही. ते तर ऋषिमुनिंच्या काळात, पूर्वी तर पति-पत्नीचा व्यवहार असा नव्हता. ऋषिमुनि लग्न करत होते, पण आधीच्याकाळी ते लग्नासाठी नाहीच बोलत असत. म्हणून मग ऋषिपत्नीने त्यांना सांगितले, की तुम्हाला एकट्याने चांगल्यापणी संसार करता येणार नाही, प्रकृती नीट राहणार नाही म्हणून आम्हा स्त्रियांची पार्टनरशीप(भागीदारी) ठेवा, त्यामुळे तुमची भक्ती ही होईल आणि संसार देखील नीट चालेल. म्हणून ह्या लोकांनी (ऋषिमुनिंनी) मान्य केले

आणि सांगितले की आम्ही तुमच्या सोबत संसार मांडणार नाही. त्यावर त्या म्हणाल्या की, तसे नाही, आम्हाला फक्त एक पुत्रदान आणि एक पुत्री दान द्या. अर्थात् ह्या दोन दानापुरतेच सोबत, त्यानंतर कुठलीही संगत नाही. त्यानंतर संसारात आमची तुमच्यासोबत फक्त फ्रेंडशीप (मैत्री). म्हणून त्यांनी हे स्वीकारले. आणि त्या मित्रासारखेच रहात होत्या, पत्नी बनून रहात नव्हत्या. ऋषिपत्नी घरातील सर्व कामे सांभाळत आणि ते बाहेरील कामे शांभाळायचे, नंतर दोघेही एकत्र भक्ती करण्यासाठी बसत असत. पण आता तर (विषयविकार) हा सर्व धंदाच झाला आहे म्हणून बिघडले आहे सर्व. ऋषिमुनि तर नियमवाले होते.

आता एक पुत्र किंवा एक पुत्रीसाठी लग्न केले तर हरकत नाही. त्यानंतर मित्रासारखे राहिलात, तर ते दु:खदायी होणार नाही. पण हे तर सुख शोधतात तर मग असेच होणार ना! दावाच करतात ना! ऋषिमुनि खूप वेगळ्या प्रकारचे होते.

एक पत्नीव्रत पाळणार ना? तेव्हा म्हणतात, 'पाळणार'. तेव्हा तुमचा मोक्ष आहे आणि जर का दुसऱ्या स्त्री बद्दल जरासाही विचार आला तर मोक्ष टळला. कारण की ते बिनहक्काचे आहे. हक्काचे तिथे मोक्ष आणि हक्काशिवाय असलेले ती पशुता अर्थात जनावरगती.

विषयविकाराची पण मर्यादा असायला हवी. स्त्री-पुरुषात विषयविकार कुठपर्यंत असायला हवा? तर परस्त्री नको आणि परपुरुषही नको. आणि त्यातून कधी त्यांचा तसा विचार आला तर ते लगेचच प्रतिक्रमणने धुवून टाकायला हवे. सर्वात मोठी जोखीम असेल तर हीच, परपुरुष आणि परस्त्री! स्वत:ची स्त्री जोखीम नाही. आता ह्यात आमची काय चुक आहे? आम्ही ओरडतो का कधी? ह्यात काही गुन्हा आहे का? ही आमची सायन्टिफिक शोधखोळ आहे! नाहीतर साधूंना तर इतपर्यंत सांगण्यात येते की, स्त्रीचा लाकडी पुतळा असेल त्याला देखील पाहू नका. स्त्री बसली असेल त्या ठिकाणी बसू देखिल नका. पण मी तसा आग्रह केला नाही ना?

ह्या काळात एकपत्नीव्रतला आम्ही ब्रह्मचर्य म्हणतो आणि तीर्थंकर

भगवानांच्या काळात ब्रह्मचर्यचे जे फळ मिळत होते तेच फळ आजही मिळेल याची आम्ही गॅरेंटी देतो!

**प्रश्नकर्ता :** एक पत्नीव्रत म्हटले ते सूक्ष्मपणे की फक्त स्थूल? मन तर जाणारच ना?

**दादाश्री :** सूक्ष्म सुद्धा असायला हवे आणि जर मन भटकत असेल तर मनापासून वेगळे रहायला हवे आणि त्याचे सतत प्रतिक्रमण करत रहावे लागेल. मोक्षाला जाण्याची लिमिट कोणती? तर एक पत्नीव्रत आणि एक पतीव्रत.

जर तू संसारी आहेस तर तुझ्या हक्काचे विषय तू भोग, परंतु बिनहक्काचे विषय तर भोगूच नकोस कारण त्याचे फळ भयंकर आहे.

हक्काचे सोडून दुसऱ्या जागी विषयभोग झाला तर, ती स्त्री जिथे जिथे जाईल तिथे तुम्हाला जन्म घ्यावा लागेल. ती अधोगतीत जाईल तर तुम्हालाही तिथे जावे लागेल.

आज-काल बाहेर सर्व असेच चालू आहे. कुठे जन्म होईल याचा काही नेम नाही. बिनहक्काचे विषय ज्याने भोगले त्याला तर भयंकर यातना भोगावी लागते. एखाद्या जन्मी त्याची मुलगी देखील चारित्र्यहीन बनते. नियम असा आहे की जिच्या बरोबर बिनहक्काचा विषय भोगला असेल तीच आई किंवा मुलगी बनून येते. बिनहक्काचे भोगले तेव्हापासूनच मनुष्यपण निघून जाते. बिनहक्काचा विषय तर भंयकर गुन्हा आहे. स्वतः दुसऱ्यांचे भोगले तर स्वतःच्या मुलींना इतर भोगतील. परंतु त्याची चिंताच करत नाही ना!

बिनहक्काच्या विषयविकारात नेहमी कषाय असतात, आणि कषाय असल्यामुळे नरकात जावे लागते. पण लोकांना हे माहितच नसते! म्हणून तर घाबरत नाही, कुठल्याही प्रकारची भीती देखील वाटत नाही. आजचा मनुष्य जन्म, हा तर मागच्या जन्मात काही चांगले केले त्याचे फळ आहे.

विषयविकार आसक्तीमुळे उत्पन्न होतात आणि त्यातून मग विकर्षण होतो. विकर्षण झाले तर त्यातून वैर बांधले जाते आणि वैरच्या 'फाउन्डेशन' वर हे जगत उभे आहे.

लक्ष्मीमुळे वैर बांधले जातात, अहंकारामुळे वैर बांधले जातात, पण हे विषयविकाराचे वैर तर खूप विषारी असते.

विषयातून निर्माण झालेला चारित्रमोह, ते तर ज्ञान वगैरे सर्व उडवून टाकतो. अर्थात् आतापर्यंत विषयविकारामुळेच सर्व अडले आहे. मूळात विषय आहे आणि त्यातून मग लक्ष्मीवर राग (मोह/आसक्ती) बसला आहे, आणि त्याचा अहंकार आहे. अर्थात् मूळ विषय जर निघून गेला, तर सर्व काही निघून जाईल.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे बी ला भाजता यायला हवे, पण बी ला कसे भाजावे?

**दादाश्री :** ते तर आपल्या प्रतिक्रमणने, आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यानने.

**प्रश्नकर्ता :** हेच? दुसरा कुठला उपाय नाही?

**दादाश्री :** दुसरा कुठला उपाय नाही. तप केल्याने पुण्य बांधाल आणि बी शेकल्यावर निराकरण होईल. समभावाने निकाल करण्याचा कायदा काय सांगतो की, तू कुठल्याही प्रकारे असे निकाल कर की त्याच्याशी वैर बांधले जाणार नाही. वैरपासून मुक्त होऊन जा.

**प्रश्नकर्ता :** ह्यात वैर कसे बांधले जाते? अनंतकाळाचे जे वैर चे बी पडते ते कश्या प्रकारे होत असते?

**दादाश्री :** त्याचे असे आहे, की मेलेला पुरुष अथवा मेलेली स्त्री असेल आणि समजा त्यात काही औषध भरले आणि पुरुष पुरुषा सारखाच राहिला आणि स्त्री स्त्री सारखीच राहिली तर काही हरकत नाही, त्यांच्या सोबत वैर बांधले जाणार नाही. कारण ते जिवंत नाहीत. आणि हे तर जिवंत आहेत म्हणून वैर बांधले जातात.

**प्रश्नकर्ता :** पण ते कश्यामुळे बांधले जातात?

**दादाश्री :** अभिप्राय 'डिफरन्स' (भिन्न) आहेत म्हणून. तुम्ही म्हणाल की, 'आता मला सिनेमा पहायला जायचे आहे.' त्यावर ती म्हणेल

की, 'नाही, आज मला नाटक पहायला जायचे आहे.' अर्थात् टाईमिंग जुळत नाहीत. जर एक्जेक्ट टाईमिंगला टाईमिंग जुळत असेल तरच लग्न कर.

ह्या अवलंबनाचे जितके सुख आपण घेतले ते सर्व उधार घेतलेले सुख आहे. लोन वर. आणि लोन म्हणजे 'री पे' (परतफेड) करावे लागते.

तुम्ही आत्म्याचे सुख उपभोगत नाही आणि पुद्गलजवळ सुख मागता. आत्म्याचे सुख असेल तर काही हरकतच नाही, पण पुद्गलकडे भीख मागितली, ती परत फेडावी लागेल. हे लोन आहे. जितके गोड वाटले असेल, तितकेच त्यातून कडूपणा भोगावे लागेल. कारण पुद्गलकडून लोन घेतले आहे. म्हणून त्याला परतफेड करते वेळी तितकेच कडू वाटेल. पुद्गलकडून घेतले म्हणून पुद्गललाच 'री पे' करावे लागेल.

आता तर आपले कित्येक महात्मा येऊन सांगतात की, 'विषय सुखासाठी आम्हला विनवण्या करायला लावते.' तेव्हा मी म्हणालो, 'तुझा प्रभाव पडत नाही म्हणूनच ती असे करायला लावते ना! आता तरी समज ना, आता तरी योगी हो!' आता ह्या वावटळातून कसे बाहेर पडायचे? ह्या दुनियेच्या वावटळातून बाहेर पडता येईल?!

एक बाई आपल्या पतीला चार वेळा साष्टांग नमस्कार करायला लावते, तेव्हा कुठे एक वेळा स्पर्श करु देते. अरे मुर्खा ! ह्या ऐवजी समाधी घेतली असती तर काय वाईट झाले असते?! समुद्रात समाधी घे, तो समुद्र तरी सरळ आहे! मग भानगडच नाही ना! विषयसुखासाठी चार वेळा साष्टांग!

**प्रश्नकर्ता :** गेल्या जन्मी आम्ही तिच्याशी संघर्ष (भांडण, क्लेश) केला असेल, तेव्हा आता ह्या जन्मात ती आमच्याशी संघर्ष करते. पण ह्याचा काही मार्ग तर काढावा लागेल ना? सोल्युशन तर शोधावे लागेल ना?

**दादाश्री :** ह्याचे सोल्युशन तर आहे, पण लोकांचे मनोबळ कच्चे आहे ना!

विषयविकारी भाग बंद केला तर आपोआपच सारे काही बंद होऊन जाईल. त्याच्यामुळेच सतत कीट-कीट चालू राहते.

**प्रश्नकर्ता :** आता ते कसे करावे? ते बंद कसे करावे?

**दादाश्री :** विषयविकार जिंकायचा.

**प्रश्नकर्ता :** विषयविकार जिंकता येत नाही, म्हणून तर तुम्हाला शरण आलो आहोत.

**दादाश्री :** किती वर्षापासून विषयविकार.. म्हातारपण आले तरी विषय? जेव्हा पहावे तेव्हा विषयविकार, विषयविकार आणि विषयविकार!

**प्रश्नकर्ता :** हा विषयविकार बंद केल्यावर सुद्धा क्लेश, नाही टळत म्हणून तर आम्ही तुमच्या चरणी आलो आहोत.

**दादाश्री :** क्लेश होणारच नाही. जिथे जिथे विषयविकार बंद आहे तिथे, मी पाहिले आहे की जे जे पुरुष मजबूत मनोबळाचे, सामर्थ्यवान आहेत त्यांच्या पत्नी त्यांच्या सांगण्यानुसार चालतात.

तिच्याशी विषयविकार बंद केल्याशिवाय दुसरा काही उपायच सापडला नाही. कारण की ह्या जगात राग-द्वेषाचे मूळ कारणच हे आहे, मौलिक कारणच हे आहे. ह्यातूनच राग-द्वेषाचा जन्म झाला. इथूनच संसार उभे झाले आहेत. म्हणून जर संसार बंद करायचा असेल तर तो इथूनच बंद करावा लागेल.

ज्याला क्लेश करायचा नसेल, जो क्लेशाचा पक्ष घेत नसेल त्याला जर क्लेश होत असेल तर ते हळू हळू कमी होत जाईल. हे तर, क्लेश केलाच पाहिजे असे मानतात तोपर्यंत क्लेश जास्त होतात. क्लेशाचे पक्षदार आपण होता कामा नये. क्लेश करायचाच नाही असा ज्यांचा निश्चय आहे, त्यांचा क्लेश घटतच जातो. आणि जेथे क्लेश आहे तिथे भगवंत उभेच राहणार नाही ना!

डबल बेडची सिस्टम बंद करा आणि सिंगल बेडची सिस्टम ठेवा. हे तर सर्वच बोलतात, 'डबल बेड बनवा, डबल बेड....' पूर्वी हिंदुस्थानात

कुठलाही मनुष्य असे झोपतच नव्हता. कुठलाही क्षत्रिय नाही. क्षत्रिय तर खूप कडक होते पण वैश्य देखील नाही. ब्राह्मण देखील अश्याप्रकारे झोपत नसत, एकही मनुष्य नाही! पहा, काळ कसा विचित्र आला आहे?

जेव्हा पासून हीराबा सोबत माझा विषयविकार बंद झाला तेव्हापासून आम्ही त्यांना हीराबा बोलू लागलो. त्यानंतर आम्हाला खास काही अडचण आली नाही. आधी थोडी विषयामुळे (अडचण) होती, त्यांच्या सोबत थोडीफार पोपटमस्ती देखील होत असे. पण फक्त पोपटमस्ती. लोक समजत की ह्या पोपटाने पोपटीनला मारायला सुरुवात केली! परंतु होते फक्त पोपटमस्ती. पण जोपर्यंत विषयचा डंख आहे तोपर्यंत ती जात नाही. जेव्हा हा डंख सुटेल तेव्हा जाईल. हा आमचा स्वत:चा अनुभव सांगत आहोत. हे तर आपले ज्ञान आहे म्हणून ठीक आहे. ज्ञान नसते तर डंख मारतच राहिलो असतो. तेव्हा तर अहंकार होता ना! अहंकाराचा एक भाग भोग असतो की त्याने मला भोगले. आणि हा पण सांगणार तिने मला भोगून घेतले. आणि नंतर (ज्ञान घेतल्यावर) आता निकाल करते ती, तरीही ती डिस्चार्ज किच किच तर राहतेच. आम्हाला तर ती किच किच सुद्धा नव्हती. असा कुठल्याही प्रकारचा मतभेद नव्हता.

हे विज्ञान तर पहा! फक्त पत्नीसोबतची नव्हे तर संपूर्ण जगा सोबतची भांडणे बंद होऊन जातात. हे विज्ञानच असे आहे आणि भांडणे बंद झाली अर्थात मुक्त झालात.

## २४. रहस्य ऋणानुबंधाचे......

लग्न तर खरोखर एक बंधनच आहे. म्हशीला (रेलगाडीच्या) डब्यात बंद केल्यासारखी दशा होते. ह्या फसवणुकीत नाही फसलात तर उत्तम, फसले गेले असाल पण तरीही त्यातून निघता आले तर अति उत्तम. नाहीतर शेवटी फळ चाखल्यानंतर निघाले पाहिजे. बाकी, आत्मा स्त्री किंवा पुरुष, कोणाचा पती, किंवा कोणाचा मुलगा होऊ शकत नाही, फक्त ही सर्व कर्मे पूर्ण होत आहेत. आत्म्यामध्ये तर काही फेरफार होत नाही. आत्मा तर आत्माच आहे, परमात्माच आहे. हे तर आपण मानून बसलो की ही माझी पत्नी!

ह्या चिमण्या सुंदर घरटे गुंफतात, तर ते त्यांना कोणी शिकवायला गेले होते? हे संसार चालवायचे (ज्ञान) तर आपोआपच होत असते. हो, 'स्वरूपज्ञान' मिळवण्यासाठी पुरुषार्थ करण्याची जरुरत आहे. संसार चालवण्यासाठी कशाचीच जरुरत नाही. फक्त हे मनुष्यच जास्त दिडशहाणे आहेत. ह्या पशु-पक्ष्यांचे बायका-मुले नाहीत? त्यांचे लग्न लावावे लागते? हे तर मनुष्यालाच बायको-मुले झाली आहेत, मनुष्यच लग्न लावण्यात गुंतले आहेत.

गाय-म्हैस यांच्यातही लग्न होतात. मुलं बाळ सर्व असतात पण आहे का तिथे पती? ते पण सासरे होतात, सासू होतात, परंतु त्यांनी बुद्धिवंतासारखी काही जुळवाजूळव केली आहे का? तिथे कोणी असे बोलतो का की मी ह्याचा सासरा आहे? तरीही आपल्या सारखाच सर्व व्यवहार आहे ना, तीही वासराला दुध पाजते. वासराला चाटत असते ना! आपले अक्कलवाले चाटत नाही.

तुम्ही स्वतः शुद्धात्मा आहात आणि हे सर्व व्यवहार वरकरणी वर वर अर्थात् 'सुपरफ्लुअस' करायचा आहे. स्वतः 'होम डिपार्टमेन्ट'मध्ये रहावे आणि 'फोरिन'मध्ये 'सुपरफ्युलूस' रहायचे. 'सुपरफ्युलूस' म्हणजे तन्मयाकार वृत्ती नाही, तर फक्त 'ड्रामेटिक.' फक्त नाटकच करायचे आहे. 'ड्रामा'मध्ये तोटा झाला तरी हसायचे आणि नफा झाला तरी हसायचे. 'ड्रामा'मध्ये तसा अभिनय करुन दिखावा पण करावा लागतो, तोटा झाला असेल तर तसा अभिनय करावा लागतो, तेथे तोंडाने बोलतात देखील की, खूप नुकसान झाले, पण आत तन्मयाकार होत नाहीत. आपण 'लटकते सलाम' (वरकरणी) ठोकावे. कित्येक जण नाही बोलत का की भाऊ, माझा ह्यांच्याशी 'लटकते सलाम' सारखा संबंध आहे?! अश्याच प्रकारे सर्व जगासोबत रहावे. ज्यांना सर्व जगाशी 'लटकते सलाम' ठेवता आले ते ज्ञानी झाले. ह्या देहासोबत पण 'लटकते सलाम,' आम्ही सर्वांसोबत निरंतर 'लटकते सलाम' ठेवतो तरीही सर्व बोलतात की, 'तुम्ही आमच्यासाठी खूप चांगली भावना ठेवता' मी व्यवहार सर्व करतो पण आत्म्यात राहून.

**प्रश्नकर्ता :** पत्नीच्या पुण्याने पतीचे सर्व चालते हे सर्व खरे आहे

का? बोलतात ना की बायकोच्या पुण्याने ही लक्ष्मी आहे आणि सर्व ठीक चालले आहे, असे खरेच असते का?

**दादाश्री :** ते तर कोणी आपल्या पत्नीला मारत असेल तर त्याला समजवण्यासाठी आपले लोक असे म्हणतात की, अरे मुर्खा, ह्या तुझ्या बायकोचे नसीब तर बघ! कशाला ओरडतोस? तिचे पुण्य आहे म्हणून तर तू खातो-पितो आहेस, अशाप्रकारे हे सुरु झाले. सर्व जीव स्वतःच्या पुण्याचेच खातात. तुम्हाला समजले ना! हे तर असे सर्व बोलले पाहिजे तरच ते सरळ वागतील ना! सर्व आपापल्या पुण्याचेच उपभोगत आहेत आणि स्वतःचे पाप देखील स्वतःच भोगत आहेत. ह्यात कोणाचे काहीही देणे-घेणे नाही. किंचित, एका केसा इतकी सुद्धा भानगड नाही.

**प्रश्नकर्ता :** कोणी शुभ कार्य करतो, उदारणार्थ, पुरुष दान करतो आणि त्यात पत्नीचे सुद्धा सहकार्य असते, तर त्याचे फळ दोघांना मिळेल?

**दादाश्री :** जरुर. करणारा आणि सहकार्य देणारा म्हणजे करविणारा अथवा कर्ता प्रत्ये अनुमोदना करणारा म्हणजे तिघांनाही, करणारा, करविणारा आणि कर्ता प्रत्ये अनुमोदना, करणारा ह्या सर्वांना पुण्य मिळते. तुम्ही ज्यांना सांगितले असेल की हे करा, हे करण्यायोग्य आहे त्याला करविणारा म्हणायचे, तुम्हाला करणारा म्हटले जाते आणि पत्नी विरोध नाही करत, तर तिला अनुमोदना करणारी म्हटले जाते. सर्वांना पुण्य मिळते. परंतु करणाऱ्याच्या हिस्यात पन्नास टक्के आणि उरलेले पन्नास टक्के त्या दोघांमध्ये वाटले जातात.

**प्रश्नकर्ता :** पूर्वजन्माच्या ऋणानुबंधातून सुटण्यासाठी काय केले पाहिजे?

**दादाश्री :** ज्यांच्याशी आपले पूर्वीचे ऋणानुबंध आहेत आणि ती व्यक्ती आपल्याला आवडतच नसेल, त्याचा सहवास देखील आवडत नसेल आणि कर्तव्य म्हणून त्याच्यासोबत रहावेच लागत असेल तेव्हा काय करावे! तर त्याच्यासोबत बाहेरचा व्यवहार जरुर करायचा पण आतून त्याचे प्रतिक्रमण करत रहायचे. कारण आपण मागच्या जन्मात अतिक्रमण केले होते त्याचा हा परिणाम आहे. कॉझीस काय केले होते? तर म्हणे,

पूर्व जन्मात अतिक्रमण केले होते, त्याचे ह्या जन्मात फळ आले आहे अर्थात् आता त्याचे प्रतीक्रमण कराल तर वजा-बेरीज होईल. म्हणून आता आत त्यांची माफी मागा, पुन्हा पुन्हा माफी मागत रहा की मी जे जे दोष केले असतील त्याबद्दल माफी मागतो. कोणत्याही भगवंताच्या साक्षीने माफी मागा, तर सर्व दोष संपून जातील, अन्यथा काय होईल की त्यांचे जास्त दोष पाहिल्याने, जसे की कोणी स्त्री एखाद्या पुरुषाला जर खूपच दोषित मानत असेल तर त्यामुळे तिचा तिरस्कार वाढेल, आणि तिरस्कार असेल तर भीती वाटेल. ज्याच्याप्रती तिरस्कार आहे त्याचेच तुम्हाला भय वाटते. त्यांना पाहिले की भीती वाटते. ह्यावरुन समजून जायचे की हा तिरस्कार आहे. अर्थात् हा तिरस्कार सोडण्यासाठी आत सतत माफी मागतच रहा. तर मग दोन दिवसातच हा तिरस्कार बंद होईल. त्यांना माहितही नसेल की तुम्ही आतून त्यांची माफी मागत आहात. त्यांच्याप्रती जे जे दोष केले आहेत, 'हे भगवान, मी त्यांची माफी मागतो.' हा माझ्याच दोषांचा परिणाम आहे. कोणत्याही व्यक्ती प्रती जे जे दोष केले असतील, तर त्यासाठी आतून भगवंताकडे त्याची पुन्हा पुन्हा माफी मांगितली तर सर्व दोष धुतले जातील.

**प्रश्नकर्ता :** आपल्याला धर्माच्या मार्गाने जायचे असेल तर घर-संसार सोडवा लागतो. ते धर्मासाठी चांगले आहेत, पण त्यामुळे घरातील लोकांना दु:ख होते. तर स्वत:साठी घर-संसार सोडावा हे चांगले म्हणावे?

**दादाश्री :** नाही. घरातील लोकांचा हिशोब फेडावाच लागतो. त्यांचा हिशोब फेडल्यानंतर, त्या सर्वांनी खुश होऊन सांगितले की 'तुम्ही जावू शकता' तर काही हरकत नाही. पण त्यांना दु:ख होईल असे काही करु नये. कारण की त्या एग्रीमेन्ट (करार)चा भंग करुन काही करु शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** भौतिक संसार सोडण्याचे मनात येत असते मन होते, तर काय करावे?

**दादाश्री :** एके दिवशी, भौतिक संसारात घुसण्याचे मन करत होते ना!

**प्रश्नकर्ता :** तेव्हा तर ज्ञान नव्हते, आता तर हे ज्ञान मिळाले म्हणून फरक पडला आहे.

**दादाश्री :** हो ह्यात फरक पडेल पण आधी संसारत जे घुसला आहात त्यातून बाहेर निघण्याचा मार्ग शोधावा लागेल. असेच पळून जाता येणार नाही.

**प्रश्नकर्ता :** प्रत्येक दिवस एक एक करून कमी होत आहे.

**दादाश्री :** 'माझे' म्हणून मरायचे. खरे तर माझे नाहीच, ती लवकर निघून गेली तर तुम्हाला एकट्याला बसावे लागेल. खरे तर दोघांनी एकत्रच गेले पाहिजे ना? आणि समजा ती जर पती (मेल्या) नंतर सती झाली, तरी पण ती कोणत्या मार्गाने गेली असेल आणि पती कोणत्या मार्गाने गेला असेल? सर्वांची आपापल्या कर्माच्या हिशोबाप्रमाणे गती होते. कोणी जनावरात जातो तर कोणी मनुष्यात जातो, तर कोणी देवगतीत जातो. त्यात जर सती बोलू लागली की, मी तुमच्यासोबत मरेन तर तुमच्यासोबत जन्म घेऊ शकेल. पण असे काही होत नाही. हा तर सर्व वेडेपणा आहे. हे पति-पत्नी असे काहीच नसते नाही. ह्या बुद्धिवंत लोकांनी अशी जुळवा-जुळव करुन ठेवली आहे.

**प्रश्नकर्ता :** हे भाऊ असे सांगतात की, जर दोघांत कुठल्याही प्रकारची तक्रार नसेल, तर पुढच्या जन्मात परत एकत्र राहू शकतो?

**दादाश्री :** ह्या जन्मातच राहू शकत नाही. ह्या जन्मातच डायवोर्स (घटस्फोट) होतात, तर मग पुढल्या जन्माची काय वार्ता करता? असे प्रेम असतच नाही ना? येत्या जन्मी एकत्र येणाऱ्या प्रेमवाल्यांमध्ये तर क्लेशच नसतो. ती तर इजि लाइफ (सरळ जीवन) असते. खूप प्रेममय जीवन असते. चुक दिसतच नाही. चुक झाली तरी दिसत नाही. असे प्रेम असते.

**प्रश्नकर्ता :** तर मग असे प्रेममय जीवन असेल तर येत्या जन्मात तेच पुन्हा एकत्र येतात की नाही?

**दादाश्री :** हो एकत्र येतात ना, कोणाचे असे जीवन असेल तर एकत्र जन्म घेतात. पूर्ण जीवनभर क्लेश केला नसेल तर ते एकत्र येतात.

## २५. आदर्श व्यवहार, जीवनात.....

**दादाश्री :** जीवन कसे सुधारावे?

**प्रश्नकर्ता :** खऱ्या मार्गाने गेल्याने.

**दादाश्री :** किती वर्षापर्यंत सुधारायचे? पूर्ण जीवन? किती वर्ष, किती दिवस. किती तास, कश्याप्रकारे सुधरेल हे सर्व?

**प्रश्नकर्ता :** माहीत नाही मला.

**दादाश्री :** हं... म्हणून तर सुधरत नाही ना! खरे तर दोनच दिवसतर सुधारायचे आहे. एक तर वर्किंग डे (कामावर जाण्याचा दिवस) आणि दुसरा, होली डे (सुट्टीचा दिवस). सकाळपासून संध्याकाळपर्यंत हे दोनच दिवस सुधारायचे आहेत. ह्या दोन्हीमध्ये फेरफार केला म्हणजे सर्वात फेरफार होईल. दोंघाचीच सेटींग (आयोजन) केली की मग बाकी सर्व त्या प्रमाणे चालेल. आणि त्यानुसार चालल्यावर तर सर्व नीट होईल. लांब लचक फेरफार करायचाच नाही. हे सर्व पण काही दररोज फेरफार करत नाहीत. ह्या दोन्हीमध्ये सेटींग करायची आहे. ह्या दोन दिवसाची व्यवस्था केली की त्यात सर्व दिवस समावलेत.

**प्रश्नकर्ता :** ही सेटींग कशी करावी?

**दादाश्री :** का? सकाळी उठलात तर उठल्यावर ज्या भगवंताचे स्मरण करायचे असेल ते करून घ्यावे. एक तर सकाळी लवकर उठण्याची पद्धत ठेवली पाहिजे. कारण की माणसांनी साधारण पाच वाजता उठायला हवे. त्यात अर्धातास स्वतःच्या एकाग्रतेचे सेवन करायला हवे. कोणी इष्टदेव वगैरे जे कोणी असतील, त्यांची भक्ती पण अर्धाएक तास करावी. म्हणजे मग रोजच चालेल असे. नंतर मग उठून ब्रश वैगेरे सर्व करून घ्यावे. ब्रश करण्याची पण शिस्त असावी. आपण स्वतःच ब्रश घ्यावे आणि स्वतःच करावे, इतर कोणाला सांगू नये. आजारी असाल तेव्हाची गोष्ट वेगळी आहे. नंतर मग चहा-पाणी येणार. त्यात कटकट नाही करायची, जे काही समोर येईल ते पिऊन घ्यावे. साखर कमी असेल तर चहा पिल्या नंतर त्यांना सांगावे की, साखर जरा कमी होती, उद्यापासून

जरा जास्त घाला. तुम्हाला त्यांना फक्त सांगायचे आहे. भांडण करू नका. चहासोबत नाष्टा-वगैर जे काही करायचे असेल ते करून मग जेवण करून कामावर जायचे. जेवण करून कामावर वर गेलात की तिथले कर्तव्य पूर्ण करा.

घरून कटकट केल्याशिवाय निघा. मग जॉब वरून परत यावे. जर जॉब वर बॉससोबत भानगड झाली असेल, तर ती रस्त्यातच शांत करून घ्या. ह्या ब्रेनचा (डोक्याचे) चेक नट गरम झाला असेल तर तो नट दाबून द्या. आणि शांतपणे घरी या, अर्थात घरात काही बाचाबाची करु नका. तुम्ही बॉसबरोबर भांडता त्यात बायकोचा बिचारीचा काय दोष? तुझे बॉसबरोबर भांडण होते की नाही?

**प्रश्नकर्ता :** होते ना!

**दादाश्री :** मग त्यात बायकोचा काय दोष? तिथे भांडण करुन आला असाल, तर पत्नी समजून जाते की स्वारी आज चांगल्या मूडमध्ये नाही. तेव्हा मूडमध्ये नसता ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** अर्थात् अशी व्यवस्था एका दिवसाची करून द्या, वर्किंग डे ची. आणि दुसरी होली डे ची. दोनच प्रकारचे दिवस येतात. कामाचा आणि सुट्टीचा तिसरा कुठला दिवस येतच नाही ना? अर्थात दोन दिवसांची योजना केली की मग त्या प्रमाणे चालत रहाणार.

**प्रश्नकर्ता :** आता सुट्टीच्या दिवशी काय करावे?

**दादाश्री :** सुट्टीच्या दिवशी नक्की करावे की आज सुट्टीचा दिवस आहे मुलं-बाळ, पत्नी, सर्वांना फिरायला मिळत नाही म्हणून जेवणानंतर त्या सर्वांना फिरायला घेऊन जा. सुट्टीच्या दिवशी छान छान जेवण बनवा. जेवणा नंतर फिरायला घेऊन. फिरण्याच्या खर्चाची मर्यादा ठेवावी की होली डेच्या दिवशी इतकाच खर्च! एखाद्या वेळेस एक्स्ट्रा (जास्त) खर्च करावा लागला तर आपण बजेट बनवू, नाहीतर इतकाच खर्च. असे सर्व तुम्ही नक्की केले पाहिजे. वाईफकडूनच तुम्ही ठरवून घ्यायचे.

**प्रश्नकर्ता :** हे सांगतात की घरी पूरणपोळी खाल्ली पाहिजे. पिझ्झा खायला बाहेर नको जायला?

**दादाश्री :** खुशाल पुरणपोळी खा, ढोकळे खा, जिलेबी खा, सर्व काही खा. जे आवडते ते सर्व खा.

**प्रश्नकर्ता :** पण हॉटेलमध्ये पिझ्झा खायला जाऊ नये?

**दादाश्री :** पिझ्झा खायला?! ते तुम्ही कसे खाऊ शकता? आपण तर आर्य प्रजा. तरीही रुची असेल तर दोन तीन वेळा खाऊ घालून नंतर हळू हळू सोडवा. हळू हळू सोडवा. एकदम बंद केलात तर ते चुकीचे ठरेल. तुम्ही देखील त्यांच्याबरोबर खायला लागा आणि नंतर हळू हळू सोडवा.

**प्रश्नकर्ता :** बायकोला असे पदार्थ बनवण्याची आवड नसेल तर आपण काय करावे?

**दादाश्री :** तुम्ही आवड बदलून टाका. दुसऱ्या बऱ्याचशा वस्तु आहेत आपल्याकडे. आवड बदलून टाका. राई आणि मेथीची फोडणी आवडत नसेल तर दालचिनी आणि काळीमिरीची फोडणी दयायला सांगा. म्हणजे मग चविष्ट लागेल. पिझ्झ्यात खाण्यासारखे आहे तरी काय?

अर्थात् सेटींग कराल तर संपूर्ण जीवन सुरळीत जाईल आणि सकाळी अर्धा तास देवाची भक्ती कराल तर सर्व काही व्यवस्थित चालेल. तुला तर ज्ञान मिळाले, म्हणजे तू तर आता शहाणा झालास. परंतु ज्यांना ज्ञान मिळाले नाही, त्यांनी थोडी भक्ती करायला हवी ना! तुझे तर आता सर्व व्यवस्थित चालले आहे ना!

हे 'अक्रम विज्ञान' व्यवहाराला किंचितमात्र बाधारूप होत नाही. प्रत्येक 'ज्ञान' व्यवहाराचा तीरस्कार करत असते. हे विज्ञान व्यवहाराचा किंचितही तिरस्कार करत नाही स्वतःच्या 'रियालिटी' मध्ये संपूर्ण राहून व्यवहाराला तिरस्कारत नाही! व्यवहाराचा तिरस्कार नाही हीच सिद्धांतिक वस्तू आहे. सिद्धांतिक वस्तू कशाला म्हणतात तर जे कधीही असिद्धांतिक रित्या परिणमन करत नाही. त्यास सिद्धांत म्हणतात, असा कोणताही कोपरा

नाही की जो असिद्धांतिक असे. अर्थात् हे 'रियल सायन्स' आहे, 'कम्प्लीट सायन्स' आहे. व्यवहाराला किंचितमात्र तिरस्कारत नाही!

कोणाला किंचितही दु:ख होणार नाही, यास शेवटची 'लाइट' म्हणावे. विरोधकाला ही शांती होईल. तुमचा विरोधकही शेवटी असे बोलेल की 'भाऊ, ह्यांच्यात आणि माझ्यात जरा मतभेद आहेत, परंतु त्यांच्यासाठी मला चांगली भावना आहे, आदर आहे! विरोध तर होतातच. विरोध तर नेहमी राहणारच आहे. ३६० डिग्रीत आणि ३५६ डिग्रीतही विरोध होतोच! तसेच ह्या सर्वांत सुद्धा विरोध तर होतोच. एकाच डिग्रीवर सर्व मनुष्य येऊ शकत नाहीत. एकाच विचारणसरणी वर सर्व मनुष्य नाही येऊ शकत. कारण की मनुष्याच्या विचारसरणीच्या चौदा लाख योनी आहेत. सांगा आता, आपल्याला किती एडजस्ट होऊ शकतील? अमुकच योनी एडजस्ट होऊ शकतात, सर्व नाही होऊ शकणार!

घरातील आपला व्यवहार सुंदर करायला हवा. पत्नीला मनापासून असे वाटू लागेल की असे (उत्तम) पती कधीच मिळणार नाहीत. आणि पतीला सुद्धा मनापासून असे वाटेल की अशी (उत्तम) पत्नी कधीच मिळणार नाही असा हिशोब जर जुळवून आणला तर मग आपण समजावे की आपण खरे ठरलो!

**प्रश्नकर्ता :** आपल्या आध्यात्मिक गोष्टी तर एवढ्या उत्कृट आहेत की त्याय काही बोलाण्यासारखे नाहीच पण व्यवहारात सुद्धा आपले बोलणे अगदी 'टॉप' चे आहे.

**दादाश्री :** असे आहे ना, की टॉपचा व्यवहार समजल्याशिवाय कोणी मोक्षाला गेले नाही. हवे तितके, बारा लाखाचे आत्मज्ञान असो, परंतु व्यवहार समजल्याशिवाय कोणीही मोक्षाला गेले नाहीत! कारण की व्यवहारच सोडवणारा आहे ना? व्यवहाराने तुम्हाला सोडले नाही तर तुम्ही काय कराल? तुम्ही 'शुद्धात्मा' आहातच, पण व्यवहार सोडेल तेव्हा ना? तुम्ही व्यवहाराचीच गूंतागूंती करत राहता न. त्याचा झटपट निवाडा आणा ना!

**जय सच्चिदानंद**

## दादा भगवान फाउन्डेशनची प्रकाशित पुस्तके

### मराठी

१. भोगतो त्याची चूक
२. एडजेस्ट एव्हरीव्हेअर
३. जे घडले तोच न्याय
४. संघर्ष टाळा
५. मी कोण आहे ?
६. क्रोध
७. चिंता
८. प्रतिक्रमण
९. भावना सुधारे जन्मोजन्म
१०. आई-वडील आणि मुलांचा व्यवहार
११. पति-पत्नीचा दिव्य व्यवहार

### हिन्दी

१. ज्ञानी पुरूष की पहचान
२. सर्व दु:खों से मुक्ति
३. कर्म का सिद्धांत
४. आत्मबोध
५. मैं कौन हूँ ?
६. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
७. भूगते उसी की भूल
८. एडजस्ट एवरीव्हेयर
९. टकराव टालिए
१०. हुआ सो न्याय
११. चिंता
१२. क्रोध
१३. प्रतिक्रमण
१४. दादा भगवान कौन ?
१५. पैसों का व्यवहार
१६. अंत:करण का स्वरूप
१७. जगत कर्त्ता कौन ?
१८. त्रिमंत्र
१९. भावना से सुधरे जन्मोंजन्म
२०. प्रेम
२१. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य
२२. माता-पिता और बच्चों का व्यवहार
२३. दान
२४. मानव धर्म
२५. सेवा-परोपकार
२६. मृत्यु समय, पहले और पश्चात
२७. निजदोष दर्शन से... निर्दोष
२८. गुरु-शिष्य
२९. पति-पत्नी का दिव्य व्यवहार
३०. क्लेश रहित जीवन
३१. अहिंसा
३२. सत्य-असत्य के रहस्य
३३. चमत्कार
३४. पाप-पुण्य
३५. वाणी, व्यवहार में...
३६. कर्म का विज्ञान
३७. आप्तवाणी - १
३८. आप्तवाणी - २
३९. आप्तवाणी - ३
४०. आप्तवाणी - ४
४१. आप्तवाणी - ५
४२. आप्तवाणी - ६
४३. आप्तवाणी - ७
४४. आप्तवाणी - ८
४५. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य (उत्तरार्ध)

★ दादा भगवान फाउन्डेशन द्वारे गुजराती, हिन्दी आणि अंग्रेजी भाषेत सुद्धा बरीच पुस्तके प्रकाशित झाली आहे. वेबसाइट www.dadabhagwan.org वर सुद्धा आपणही सगळी पुस्तके प्राप्त करू शकता.

★ प्रत्येक महिन्यात हिन्दी, गुजराती आणि अंग्रेजी भाषेत दादावाणी मेगेझीन प्रकाशित होत आहे.

# संपर्क सूत्र

## दादा भगवान परिवार


**अडालज** : **त्रिमंदिर**, सीमंधर सिटी, अहमदाबाद-कलोल हाईवे,
पोस्ट : अडालज, जि.-गांधीनगर, गुजरात - 382421.
फोन : (079) 39830100, E-mail : info@dadabhagwan.org

**अहमदाबाद** : **दादा दर्शन**, ५, ममतापार्क सोसाइटी, नवगुजरात कॉलेजच्या मागे उस्मानपुरा, अहमदाबाद-380014. फोन : (079) 27540408

**वडोदरा** : **दादा मंदिर**, १७, मामाची पोल-मुहल्ला, रावपुरा पुलिस स्टेशन समोर, सलाटवाड़ा, वडोदरा. फोन : 9924343335

**गोधरा** : **त्रिमंदिर**, भामैया गाँव, एफसीआई गोडाउन समोर, गोधरा (जि.-पंचमहाल). फोन : (02672) 262300

**राजकोट** : **त्रिमंदिर**, अहमदाबाद-राजकोट हाईवे, तरघड़िया चोकड़ी (सर्कल), पोस्ट : मालियासण, जि.-राजकोट. फोन : 9924343478

**सुरेन्द्रनगर** : **त्रिमंदिर**, लोकविद्यालय जवळ, सुरेन्द्रनगर-राजकोट हाईवे, मुळी रोड.

**मोरबी** : **त्रिमंदिर**, पो-जेपुर (मोरबी), नवलखी रोड, ता-मोरबी, जि-राजकोट, फोन : (02822) 297097

**भुज** : **त्रिमंदिर**, हिल गार्डनच्या मागे, एयरपोर्ट रोड. फोन : (02832) 290123

| | | | |
|---|---|---|---|
| **मुंबई** | : 9323528901 | **दिल्ली** | : 9810098564 |
| **कोलकता** | : 9830006376 | **चेन्नई** | : 9380159957 |
| **जयपुर** | : 8290333699 | **भोपाल** | : 9425024405 |
| **इन्दौर** | : 9039936173 | **जबलपुर** | : 9425160428 |
| **रायपुर** | : 9329644433 | **भिलाई** | : 9827481336 |
| **पटना** | : 9431015601 | **अमरावती** | : 9422915064 |
| **बेंगलूर** | : 9590979099 | **हैदराबाद** | : 9989877786 |
| **पूणे** | : 9422660497 | **जालंधर** | : 9814063043 |

**U.S.A.** : **(D.B.V. I.)** +1 877-505-DADA (3232)

| | | | |
|---|---|---|---|
| **U.K.** | : +44 330-111-DADA (3232) | **UAE** | : +971 557316937 |
| **Kenya** | : +254 722 722 063 | **Singapore** | : +65 81129229 |
| **Australia** | : +61 421127947 | **New Zealand** | : +64 210376434 |

**Website : www.dadabhagwan.org**



## समजूतीने सावरा घरसंसार

हे अक्रम विज्ञान तर पहा! फक्त पत्नीसोबतीच नव्हे, तर साऱ्या जगासोबतची भांडणे बंद होऊन जातात. भाडंणे मिटली अर्थात् आपण मुक्त झालो. घरातील आपला व्यवहार सुंदर केला पाहिजे. पत्नीला मनापासून असे वाटू लागेल की असे ( उत्तम ) पती कधीच मिळणार नाहीत. आणि पतीला सुद्धा मनापासून असे वाटेल की अशी ( उत्तम ) पत्नी कधीच मिळणार नाही. असा हिशोब जुळवून आणला तर समजावे की आपण खरे. जर अशी समज फिट केली तर संपूर्ण जीवन खूप सुंदर प्रकारे व्यतित होईल.

\- दादाश्री

ISBN 9789382128618

9 789382 128618

Printed in India

dadabhagwan.org